ज्ञानाज्ञानविलासोऽयं ज्ञानाज्ञाने च पश्यति ।
ज्ञानाज्ञाने परित्यज्य ज्ञानमेवावशिष्यते ॥ ५ ॥

हा विलास ज्ञानाज्ञानाचा । ज्ञानाज्ञानरूप दिसे साचा । वोहट होतांचि दोहींचा । ज्ञानमात्रचि उरे ॥ ९३ ॥ जैसें निवळबीज जाण । पाणियाचा गाळ नासून । आपण नासे परी जीवन । उरे जैसें ॥ ४१० ॥

उपासना हें निवळीचें बीज आहे, असा साधकांनीं काकांच्या उपासनेपासून बोध घेण्यासारखा होता. एरव्हीं उपासनारूप निवळीच्या बीजाची त्यांना कधींच गरज नव्हती. ते सदां शुद्धबुद्धच होते. पण व्यवहारांत अंतर्बाह्य शुद्धीचे साधनमार्ग व शिष्टाचार ते अत्यंत दक्षतेनें पाळीत. बहिर्दिशेहून आल्यावर हातापायाला पांच वेळां माती लावून ते धुवावयाचे यास ते कधीं चुकले नाहींत, त्यांचें स्नान कधीं अंतरलें नाहीं, आणि नुसती पोथी वाचावयाची तरी ती धाबळी नेसून सोंवळ्यानेंच वाचावयाची हा त्यांचा नियम अबाधित चालत असे. तरी पण असा व्यवहार करीत असतां खरें शौच म्हणजे काय हेंहि त्यांच्याचकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहणाराचे सहज लक्षांत येई.

अत्यंतमलिनो देहो देही चात्यंतनिर्मलः ।
असंगोऽहमिति ज्ञात्वा शौचमेनत्प्रचक्षते ॥ ६ ॥

देह तो मलिन अत्यंत । निर्मल आत्मा सदोदित । असंग ऐसा मी जाणत । शौच त्यातें बोलिजे ॥ ४२१ ॥ देह एक उपलक्षण । परी सर्वही तत्त्वें मलिन । जीं व्यापिलीं अविद्येनें । यांसी शुद्धता कैंची ॥ २२ ॥ जैसें गाढव धुतलें । पीतांबरें वेष्टिलें । सोंवळें करून आणिलें । ब्राह्मण पंक्ती ॥ २६ ॥... जैसा घट बाटला । धुणें न लागे आकाशाला । तैसें देहसंबंधें आत्मयाला । प्रायश्चित्त नको ॥ ३१ ॥...आकाश जरी अतिशुद्ध । परी शून्यपणें तें अशुद्ध । आत्मा सहज शुद्धबुद्ध । नव्हे आकाशा ऐसा ॥ ३४ ॥ जीव तो निःशेष वाळिला । ईश्वर मायेनें बाटविला ॥ उपमितां स्वरूपाला । साहित्य न बाटे ॥ ४३५ ॥

याप्रमाणें जीव हा जन्माचाच बाटलेला आहे. उलट आत्म्याच्या शुद्धतेला उपमा नाहीं. तो सदा निःसंग व शुद्ध आहे. हीच काकांची निभ्रांत दृष्टि वरचेवर उघड दिसून येई. त्यांचे नाथ-महाराज हे जातीनें मराठे होते. पीरवाडीस श्रीगुरुगृहीं हे सोवळ्यानें पोथी वाचीत बसले असतां किंवा जेवीत असतांहि श्रीनाथमहाराजांचा पणतु [श्री. कोंडिबा महाराजांचा ] लहान मुलगा क्वचित त्यांचे जवळ जाऊन त्यांस शिवे. त्यास त्यांनीं कधीं झिटकारलें नाहीं. मुंबईस एकदां तर ते सोंवळे असतांना एक पारशी भक्त त्यांच्या पायांवर डोकें ठेवून त्यांचें दर्शन घेऊन गेला. शुद्धप्रेमाला विटाळ नाहीं. श्रीगुरुगृहीं तर सारेंच पवित्र. अशी त्यांची भावना असावी. त्याचप्रमाणें त्यांचा भगवद्भाव व त्यांची अहिंसा, असामान्य कोटींतलीच होती. त्यांच्या पात्राभोंवतीं मांजरांचा गराडा असे, त्यांस त्यांनीं कधीं छुत् केलें नाहीं. त्यांच्या माच्यांत, त्यांच्या उशागतीं, त्यांच्या अंगांतल्याचे गळपट्टींत कधीं कधीं ढेंकूण असत, ते त्यांनीं कधीं मारले नाहींत. ते म्हणत, ते मला चावत नाहींत.

त्यांच्या अंतरींची निःसंगता फार प्रखर होती. त्यांचे पुत्र व जामात अगदींच अकालीं वारले. त्याचा त्यांच्या मनावर कांहीं परिणाम झाला नाहीं. त्यांना अत्यंत क्लेशदायक रोगांनीं अनेक वेळां पछाडलें, पण त्यांनीं कधीं ' आयाई ' केलें नाहीं. अठरा विश्वें दारिद्र्य आणि दुर्धर रोग यांच्या आघातांनीं त्यांच्या समाधानी वृत्तींत तिलमात्र फरक पडला नाहीं. सावकारांनीं टोंचून खाल्लें तरी ते शांतपणें सहन करीत.

एकदां त्यांच्या कुटुंबाला कोणा एका बाईनें अपशब्द बोलून व अत्यंत वाईट दुरुत्तरें वापरून फार दुःख दिलें. तेव्हां त्या डोळ्यांत आंसवें आणून काकांजवळ रागारागानें आपलें गाऱ्हाणें सांगूं लागल्या. काका त्यावेळीं पूजा करीत होते. ते बायकोची तक्रार ऐकून

हांसत हांसत म्हणाले, 'अगे, त्या बाईनें देऊं नये त्या तुला शिव्या दिल्या म्हणतेस, त्या तूं घेतल्या असल्यास तर त्या माझ्या ह्या फडक्यांत टाकून मोकळीक हो,' असें म्हणून त्यांनीं फडकें जमिनीवर पसरलें. व पुढें म्हणाले—'तुला जर त्या या फडक्यांतून देतां येत नसतील तर मग तूं त्या घेतल्यास कशा ?" मग काकांनीं त्या बाईला बोलावून आणलें व तिलाहि तितक्याच शांतपणें व विनोदानें ते म्हणाले, "अगे बाई, तूं हिला पुन्हां शिव्या देत जाऊं नकोस. ती खुळी तुझ्या सार्‍या शिव्या घेते ! तूं त्या मला देत जा. मी त्यांतून एक सुद्धां घेणार नाहीं!" याप्रमाणें शिवीगाळीचा एक मोठा तंटा त्यांनीं सहज विनोदानेंच तोडला. या लहानमोठ्या सर्व प्रकारांत त्यांची अंतःशुद्धि व बाह्य विकारांपासून अत्यंत निःसंगता चांगलीच दिसून येई. ती केवळ त्या गोष्टींच्या वर्णनांत तितकी वठणार नाहीं.

काकांची भक्तमंडळी सुस्नात होऊन त्यांस रोज स्नान घालीत. एकदां त्यांचें स्नान बहुतेक संपलें असतां एक त्यांचा भक्त आपल्या गांवीं जाण्यासाठीं निघाला. त्यावेळीं त्याला सुतक आलेलें होतें. यामुळें काकांचा निरोप घेतांना नित्याप्रमाणें त्यांच्या पायांवर मस्तक ठेवतां येणार नाहीं, याचें त्यास वाईट वाटूं लागलें. काकांच्या ही गोष्ट लक्षांत येऊन ते म्हणाले, 'हँ, चटकन् डोकें ठेवून चालूं लागा !' त्या प्रेमळ भक्ताचें अंतःकरण भरून आलें ! त्यानें सद्गदित अंतःकरणानें त्यांच्या पायांवर डोकें ठेवलें. व तो श्रींचा प्रेमाचा निरोप घेऊन निघून गेला. पण श्रींचें तें प्रेमसागरांतील स्नान व आपलें अशौचांतील वंदन तो जन्मांत कधीं विसरला नसेल. ते सदा सुस्नातच होते. त्यांच्या मनानें सहजानंदांत सदांच बुडी मारलेली असे. मीनाप्रमाणें केवळ व्यवहारापुरते ते पाण्यावर आलेले दिसत, इतकेंच.

**मन्मनो मीनवन्नित्यं क्रीडत्यानंदवारिधौ ।**
**सुस्नातस्तेन पूतात्मा सम्यग्विज्ञानवारिणा ॥ ७ ॥**

उत्तम विज्ञानजलें सुस्नात । तेणें होत्साता पूत ।
मन आनंद समुद्रा आंत । नित्य क्रीडत मीनापरी ॥ ४४४ ॥

एकदां काकांना अशौच आल्यामुळें त्यांचें नित्य संध्यादिकर्म बंद होतें. म्हणून दुपारीं ते निजले होते. अशा वेळीं जवळच बसलेल्या एका भक्तानें सहज बारकाईनें लक्ष दिलें, तों त्यांचा झोंपेंत अखंड रामनामाचा जप सुरू आहे, असें आढळून आलें. ‘ झाली संध्या संदेह माझा गेला । आत्माराम हृदयीं प्रगटला ॥’ अशी त्यांची संध्या नेहमींची झालेलीच होती.

**अथाघमर्षणं कुर्यात्प्राणापाननिरोधतः**
**मनः पूर्णे समाधाय मग्नः कुंभो यथाऽर्णवे ॥ ८ ॥**

आतां प्राणापान निरोधून । घट जैसा सागरीं मग्न ।
तैसें पूर्णीं स्थापून मन । अघमर्षण कीजे ॥

याप्रमाणें काकांच्या आंतबाहेर सर्वत्र रामच संचरलेला होता. श्रीरामकृष्णांची जशी काली देवी तसे काकामहाराजांचे प्रभु रामचंद्र असत. दोघेहि मूर्त्युपासकच दिसत. पण दोघांची वृत्ति आत्मस्वरूपांत पुरी मुरलेली असे. यामुळें श्रीरामकृष्णांप्रमाणें काकांचें बोलणें फारच साधें पण अर्थानें भरलेलें असे. ते रामकृष्णांपेक्षांहि फार थोडें बोलत. वाणीच्या द्वारां ते मनाला फारसें बाहेर जाऊं देत नसत. स्तोत्रपाठ व अध्यात्मरामायणाचा पाठ यांशिवाय ते वाणीचा व्यय फारसा करीतच नसत. त्यांचें मन सदा अंतर्मुखच असे.

**लयविक्षेपयोः संधौ मनस्तत्र निरामिषम् ।**
**स संधिः साधितो येन स मुक्तो नात्र संशयः ॥ ९ ॥**

लयविक्षेपसंधीआंत । मन तेथें विषयरहित । तो संधि साधितां मुक्त । येथें संशय नाहीं ॥ ४८८ ॥ पाणी वेगळें जाणिलें । मग तरंगींही देखिलें । स्वानुभवें सामान्य कळलें । मग देखे विशेषीं ॥ ५०८ ॥ जोंवरी उरे अनुभव । तोंवरी साधक ऐसें नांव । अभिन्न होतांचि स्वभाव । तोचि सिद्ध ॥ ९ ॥

सिद्ध आणि साधक असें काकांचें अंतर्बाह्य स्वरूप दिसे. श्रीरामकृष्ण परमहंस यांचें जें वर्णन वाचण्यांत येतें त्यावरून त्यांच्यांत व यांच्यांत वरवर पाहणारास असा भेद दिसण्यासारखा असे कीं ते भजनी होते, हे कर्मठ दिसत. त्यांची वरचेवर भावसमाधि लागे. यांची सहज समाधि असे. श्रीरामकृष्णांप्रमाणें ते कोणाशीं फारसें बोलत नसत.

**सर्वत्र प्राणिनां देहे जपो भवति सर्वदा ।**
**हंसः सोहमिति ज्ञात्वा सर्वबंधैः प्रमुच्यते ॥ १० ॥**

सर्व प्राणियांच्या देहीं । जप चाले सर्वदाही । सोहं हंस जाणून पाहीं । सर्वबंधें सोडिजेतो ॥ १२ ॥ ब्रह्मचि प्रत्यगात्मा निश्चय । हींचि जाणा अक्षरें द्वय । दशपदींहि अर्थ काय । यावीण असे ॥ ५२० ॥ एकाक्षर जोॐकार । तींचि ही दोनी अक्षर । पुढें पावलीं विस्तार । त्रिपदारूपें ॥ २१ ॥ एवं संध्या जप ऐसे । विचार साधन साधकां दिसे । सिद्धाअंगीं अनायासें । सहजगति होती ॥ २५ ॥ त्याशीं पाहिजे त्रिकाळ । याशीं नको काळ वेळ । त्या पाहिजे आसन माळ । हा मोकळा सदा ॥ ५२७ ॥

असें हें सिद्धाचें वर्णन आहे. परंतु सामान्य जनांचा उद्धार करण्याकरितां जन्मास आलेले संत सामान्य जनतेपुढें आदर्श असावा म्हणून आपला साधनमार्ग, सिद्ध झाल्यावरहि बहुधा सोडीत नाहींत, असें दिसतें. अथवा त्यांच्या देहाचा मूळ स्वभाव जात नाहीं, असें वाटल्यास म्हणावें. यामुळें ते सिद्ध असूनहि उपासक दिसतात. कर्मसंन्यास करीत नाहींत. वस्तुतः सिद्धाची स्थिति अनिर्वचनीयच असते. साधकांच्या साधनद्वारां सिद्धांचें वर्णन करीत असतात. तीं साधनें कांहीं सिद्धांचे ठिकाणीं उघड दिसतात. सिद्ध बालोन्मत्त

पिशाचवत् किंवा उपासकासारखें सोंग घेऊन बसतात, किंवा त्यांचें जें साधकावस्थेंतील बाह्यस्वरूप त्यांत ते सिद्ध झाल्यावरहि फारसा पालट करीत नाहींत. नाशिकचे रघुनाथ भटजी व धोपेश्वरचे रघुनाथ महाराज यांची अंतःस्थिति फारच झांकलेली असे. उदाहरणार्थ, काकांचा तर्पणविधि सामान्य कर्मठ ब्राह्मणाप्रमाणेंच असे. पण त्यांचें खरें तर्पण आचार्य वर्णितात, त्याप्रमाणें वेगळें होतें.

**तर्पणं स्वसुखेनैव स्वेंद्रियाणां प्रतर्पणम् ।**
**मनसा मन आलोक्य स्वयमात्मा प्रकाशते ॥ ११ ॥**

निजवृत्तिसुखेंकडून । स्वइंद्रियां करी तर्पण । मनें मना प्रबोधून । स्वयें आत्मा प्रकाशे ॥ ३१ ॥ विषय वेगळे सर्वांचे । एकमेकां घेतां न वचे । परी नवल या निजसुखाचे । सर्वांसी सारिखें ॥ ४६ ॥ नामरूप कोंडा सांडिला । विषयमात्रीं आनंद देखिला । मग पाहती जों आपणाला । तों तेंचि अंगें ॥ ४७ ॥ वेगळा भाव जो कल्पिला । तो तत्काळची निमाला । ब्रह्मानंदचि दाटला । इंद्रियविषयाविण ॥ ४८ ॥ आनंदातें सेवूं गेले । तों आनंदेंचि यांसी भक्षिलें । विषय इंद्रिय दोन्ही झाले । एकरूप ॥ ४९ ॥ मी कांहीं ब्रह्म नव्हे । मज हें सुखदुःख आहे । हेंचि अशुद्ध मन पाहें । ओळखूनियां ॥ ५६ ॥ मी आत्माचि असंग । एकलांचि अभंग । शुद्ध कल्पनेतें उमग । ऐशिये रीती ॥ ५७ ॥ अशुद्ध कल्पना ज्ञानें गेली । शुद्ध कल्पनाही विराली । पुढें जे कांहीं उरली । निजात्मप्रभा ॥ ५८ ॥

'विषय तो झाला आम्हां नारायण' अशीच काकांची अंतःस्थिति होती. एका अध्यात्मरामायणाच्या पठणांत त्यांच्या साऱ्या इंद्रियांची तृप्ति आहे, असें दिसत असे. आणि अखेर अखेर तें अध्यात्म-रामायणहि अखंड वाचीत बसण्याचा त्यांचा आग्रह सुटला. तरी पण "मन रामीं रंगलें, अवघें मन रामचि झालें," हाच त्यांचा अनुभव असे. ते देहभानावर असतां रामोपासक दिसत. बाकी ते रामरूपच होते. रामप्रेमांत त्यांचें चित्त विरून गेलेलें असे.

आत्मनि स्वप्रकाशाग्नौ चित्तमेकाहुतिं क्षिपेत् ।
अग्निहोत्री स विज्ञेय इतरे नामधारकाः ॥ १२ ॥

आत्मा स्वप्रकाशअग्नींत । एकाहुति अर्पी चित्त । तो अग्निहोत्री जाणिजेत। येर हे नामधारी ॥ ६२ ॥ देहकुंड हें शुद्ध केलें । विवेकानें सारविलें । साधन-चतुष्टय मेळविलें । उपसाहित्य तेथें ॥ ६३ ॥ आत्मा हा पूर्वारणी । प्रणव तोचि उत्तरारणी । ज्ञानविचार मंथास्थानीं । अनुसंधान मंथन ॥ ६४ ॥ कामादिक इंधनीं । किंचित पडतां ज्ञानाग्नी ॥ सन्निध वैराग्य धमनी । फुंकिला नेटें ॥ ६५ ॥ तेव्हां ज्ञानाग्नि धडाडी । ज्वाला धांवती ब्रह्मांडीं । आत्मप्रकाशें बापुडीं । गेलीं नामरूपें ॥ ६६ ॥ अग्नि ऐसा प्रगटल्यावरी । आहुतीची जाणावी परी । बारा सोळा सांडोनी दूरी । एकाहुति योजिली ॥ ६७ ॥ जेणें नामरूप कल्पिलें । नसतांचि सर्व उभविलें । तें हें चित्त जाणा वहिलें । विकाररूपी ॥ ६८ ॥ निजानुभवाचे हातीं । तेचि घेऊन एकाहुति । आत्मा अग्नि स्वयंज्योती । टाकिला त्यांत ॥ ६९ ॥ आहुति पडतां अग्नींत । अग्निच होऊन राहत । तेणें नामरूपादि संकेत । त्यासवें गेला ॥ ५७० ॥ हें सिद्धाचें लक्षण । साधकाचें याहूनि भिन्न । क्षणक्षणां चित्त अर्पण । करी तोही अग्निहोत्री ॥ ७४ ॥

काकांकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहणारास असें वाटे कीं सुख आणि दुःख ऱ्या संवेदना घेणारें चित्तच यांच्या ठिकाणीं नाहीं. त्यांच्या मनावर दुःखाची छटा कधींच कोणी पाहिली नाहीं व त्यांना कधीं विशेष हर्ष झाला आहे, असेंहि फारसें कधीं दिसलें नाहीं. सामान्य जनांस ते नेहमीं उदासीन (म्हणजे खिन्न नव्हे) व क्वचित् प्रसन्न (म्हणजे उल्हसित नव्हे) दिसत. ईशप्रेम ही एकच वृत्ति त्यांच्या संयमनाला दाद न देतां मधून मधून प्रेमाश्रुद्वारां परिस्फुट होई. पण तीहि वृत्ति ते लगेच आवरून घेत. त्यांच्या भक्तांपैकीं कित्येक निवडक व जास्त संघटणांतील सांप्रदायिकांजवळ ते कधीं कधीं जास्त मोकळेपणानें व प्रेमानें बोलत. तसेच इतर आल्यागेल्याशींहि वागतांना ते व्यवहारांत कधीं चुकत

नसत. पण त्यांच्या या व्यावहारिक शिष्टाचार पद्धतींत त्यांच्या अंतरींची निःसंगता मुळींच मोडत नसे.

**देहो देवालये प्रोक्तो देही देवो निरंजनः ।**
**अर्चितः सर्वभावेन स्वानुभूत्या विराजते ॥ १३ ॥**

देह देवालय बोलिजे । निरंजन देव ओळखिजे । स्वानुभवें अर्चितां विराजे । सर्वात्मभावें ॥ ७९ ॥ देह एक उपलक्षण । परी जें जें डोळियां दिसणें । ब्रह्मांड दृश्य हें संपूर्ण । जडरूपें देऊळ ॥ ६८० ॥ जितुकीं भासती चंचळ । मायादि तत्त्वें सकळ । हें ओळखावें केवळ । पूजासाहित्य ॥ ८३ ॥ अहंकार हा पूजारी । देऊळ आणि सर्व सामुग्री । देवामाजी अर्पण करी। आपणा-सकट ॥ ८४ ॥ जीव ईश्वर मेळविले । हेंचि देवा स्नान झालें । जडजात विवेकें उगाळिलें । गंध तें हेंचि ॥ ८५ ॥ चंचल तितुकीं सुमनें । ओंविली चैतन्य तंतूनें । सच्चिद्रूपीं अर्पितां तेणें । अतिशोभा पावलीं ॥८६॥ अज्ञान धूप जाळिला । ज्ञानदीप उजळिला । धुरेंवीण दाटला । प्रकाशचि ॥ ८७ ॥ निजतृप्ति नैवेद्य पूर्ण । तांबूल अखंडैकरस जाण । हरपलें जें द्वैतभान । फलादि हेंचि ॥ ८८ ॥ पूर्ण जें का समाधान । हेंचि दक्षिणा अर्पण । एवं झालें हें पूजन । व्यतिरेक-रूपें ॥ ८९ ॥ अन्वयरूपें प्रदक्षिणा । गुणवतांही सर्वपणा । एकलाचि देवराणा । एकपणेंवीण ॥ ५९० ॥ ऐसें ज्ञात्याचें पूजन । सर्वभावें स्वानुभूतीनें । अस्ति-भाति-प्रियत्वानें । विराजे अति ॥ ५९२ ॥

काका वर्णाश्रमधर्माच्या कडक शिस्तीनें वागणारे एक मूर्तिपूजक आहेत, असेंच दिसे. त्यांची अंतर्निष्ठा दिसून येण्याचे प्रसंग फारच थोडे. ती निष्ठा बाहेर व्यवहारांत दिसूं नये, असाच त्यांचा प्रयत्न असेल असें म्हणवत नाहीं, उलट ती क्वचित् प्रसंगोपात्त दिसून येई, ती सहज दिसून येई, इतकेंच. माझ्या अंतर्निष्ठेचें यावेळीं जास्त उघड दिग्दर्शन होईल, इकडेहि त्यांचें लक्ष नसे.

मुंबईचे सुप्रसिद्ध धनगर साधु श्री वाग्देव हे त्यांस मारुतिराय समजत. उलट ते त्यांना काय समजत हें ठाऊक नाहीं. पण त्यांच्या

एका भेटींत काकांनीं त्यांच्यापुढें बसून त्यांच्या नित्य पाठांतलि महिम्न-स्तोत्रांनीं स्तव केला. तो कां व कोणाचा, हें गूढ त्यांचे तेच जाणोत.

काकांस एकदां मलकापुरास एका नवीन मारुतीच्या देवळांत मारुतीच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करण्यास मेण्यांत बसवून त्यांची भक्तमंडळी नेत असतां, त्यांनीं रस्त्यांत मध्येंच मेणा थांबविला, ते खालीं उतरले व पुढून येणाऱ्या एका गाढवाला त्यांनीं साष्टांगनमस्कार घातला. व मग ते पुढें चालूं झाले. या प्रकाराबद्दल पुढें त्यांस एका भक्तानें विचारतां 'मला तो भगवान वाटला!' असें कांहीं त्रोटक उत्तर देऊन त्यांनीं जास्त खुलासा करण्याचें टाळलें.

एकदां कृष्णंभट पाटणकर या नांवाचे दक्षिणेकडील कोणी एक कर्मठ वैदिक ब्राह्मण साऱ्या हिंदुस्थानच्या यात्रा करीत करीत धोपेश्वरीं आले. ते काकांकडे आले. काकांना पाहून 'धीरस्तत्र न मुह्यति' हें गीतावचन त्यांच्या तोंडून निघालें. पुढें ते काकांच्या घरीं राहिल्यावर लगेच फार आजारी झाले. ते महिना दीड महिना आजारी होते. त्यांचीं मुलेंमाणसें मद्रास प्रांतांत कोठें दूर राहात होतीं. त्यांचा पत्ता काकांना त्यांचेकडून कळला होता. तेव्हां त्यांनीं त्यांस कळवलेंहि असेल. पण कोणींच आलें नाहीं. ते दीड महिना अंथरुणाला खिळून होते. त्यांचा रोग दुर्धर होता, आणि स्वभावानें ते अत्यंत तामसी होते. काका रात्रंदिवस त्यांच्या अंथरुणाशीं बसून त्यांची सर्व प्रकारची सेवा करीत होते. काका त्यावेळीं सुमारें ऐशी वर्षांचे वृद्ध होते. वृद्धावस्थेमुळें कमर वाकून त्यांच्या शरीराची जवळ जवळ घडी झाली होती! अशा स्थितींत त्या अपरिचित तामसी पांथस्थाचे खांकेरे, मलमूत्र काढण्यापासून सारी सेवा त्यांनीं रात्रंदिवस अत्यंत शांत वृत्तीनें केली! ती इतकी कीं, त्यापायीं त्यांचें कधींच न अंतरणारें नित्यकर्महि अंतरलें! पुढें त्या

पांथस्थाचा त्याच दुखण्यांत अंत झाला. त्याचें और्ध्वदेहिकहि काकांनींच करून त्या तिथीला पुढें ते ब्राह्मणहि सांगत असत. एका भक्तानें त्यांस ह्या विलक्षण प्रकाराबद्दल मागून विचारलें, त्यावर, 'ते मला सद्गुरूसे वाटले' असें त्रोटक उत्तर देऊन त्यांनीं अधिक खुलासा केला नाहीं.

काका अत्यंत मित भाषणी होते. त्यांना असे प्रश्न जास्त कमी विचारण्याचा कोणाला धीरहि होत नसे. कोणी त्यांस पुष्कळ प्रश्न विचारून छेडावें, असें मनांत आणीत. पण त्यांची नजरानजर झाली कीं त्या पृच्छकाचे सारे प्रश्न मनांतच राहात. एखादा प्रश्न भीत भीत बावळटासारखा विचारून तेथेंच त्याच्या जिज्ञासेची समाप्ति होई. काकांच्या विभूतिपूजेचे हे दोनतीन नमुने त्यांच्या अंतर्निष्ठेची उत्तम साक्ष देतात.

काका बहुधा कोणास ध्यान करण्यास सांगत नसत. 'साधल्यास करा बापडें पण तें नीट साधणें कठीण,' असाच त्यांचा अभिप्राय असावा. गुरूंच्या पादुकांची पूजा, गुरूंच्या फोटोची पूजा इत्यादि पूजाप्रकारांचेंहि त्यांना अगत्य वाटत नसे. मुख्य भाव पाहिजे असें ते म्हणत. कोणत्या तरी एकाच ग्रंथाचें नित्य पद्धतशीर पठण आणि मनांतल्या मनांत घेववेल तितकें अखंड नामस्मरण अशी त्यांची उपासनापद्धति असे. नामस्मरणहि कोणचें तरी एकच असावें, व तबला, पेटी, मंडळी यांच्या समवेत मोठ्यांनीं भजन करण्यापेक्षांहि एकट्यानें मनोमय भजन करावें तें अधिक बरें असेंच त्यांचें सांगणें असे. ज्याप्रमाणें अनभ्यस्तानें ध्यान करण्याने भानगडींत पडूं नये असें ते म्हणत, त्याप्रमाणें अनधिकारी साधकानें उगाच वेदान्तचर्चेच्या वाचेच्या गोंधळांत सांपडूं नये असेंहि ते बजावून सांगत.

**मौनं स्वाध्ययनं ध्यानं ध्येयं ब्रह्मानुचिंतनम् ।**
**ज्ञानेनेति तयोः सम्यङ्निषेधांतः प्रदर्शनम् ॥ १४ ॥**

मौन तेंचि स्वाध्ययन । ब्रह्मचिंतन तें ध्यान । ज्ञानें वाणी मन निषेधून । दर्शन उत्तम ध्येयाचें ॥५९९॥ अहंब्रह्म झालें स्फुरण । तोचि आदिनारायण । वेदहि तयापासून । प्रगट झाले ॥ ६०५ ॥ शब्द ब्रह्म हा इतुका । वाणी ज्या कां परादिका । त्यामाजीं वास्तव्य एका । वेदरायाचें ॥ ६१८ ॥ अवघ्या ह्या मातृका वेद । निर्धार झाला अभेद । मग जो जो मुखीं निघे शब्द । तें तें अध्ययन ॥ ६२५ ॥ बरें वाईट न म्हणे । सत्य मिथ्या उच्चारूं नेणे । मुखा आलें तें बोलणें । हेंचि मौन ॥ ६२६ ॥ मुखीं घालून दांतखिळी । सैर आशा केली मोकळी । तें मौन नव्हे आंवळी । अविद्यामाया ॥ ६२९ ॥ ध्याता आणि ग्राहक । दोन्ही नसतां जें एक । उरे निषेधअंतक । अधिष्ठान मात्र ॥ ६३५ ॥ दीप जेणें मालविला । मालविता त्यासवें मेला । तरी नाहींपणा देखिला । दीपाचा कोणें ॥ ६३७ ॥ तस्मात् मनधाणी विचार । शून्या सहित भासमात्र । जातां उरे ज्ञप्तिमात्र । ध्येयरूप ब्रह्म ॥ ६३९ ॥ ऐसें ज्ञात्याचें ध्यान । नलगे एकांत आसन । जेथें जेथें जाय मन । तो तो ब्रह्मसमाधि ॥ ६४० ॥ हें न जाणतां अज्ञान । बळेंचि मन आवरून । करिती मूर्तीचें ध्यान । जाऊनी एकांतीं ॥ ६४५ ॥ मूर्ति आंठवितां अंतरीं । तेथें आली दिव्य नारी । ते विवेकें सारिली जरी । तों श्वान देखे ॥ ६४६ ॥ जें जें दिसतें भासतें । ब्रह्मचि कां नव्हे तें तें । अखंड ध्यानाचि ऐतें । विचारें न कळे ॥ ६४८ ॥ अखंड ध्यान हें न कळें । अज्ञान द्वैत न मावळे । बळेंचि झांकितां डोळे । ध्यान न घडे ॥ ६४९ ॥

काकांची एकनिष्ठा विलक्षणच होती. सातार्‍यास असतांना त्यांनीं सद्गुरूंच्या घरापलीकडे दुसरे कोणत्याच तीर्थक्षेत्राकडे जाण्याची इच्छा धरली नाहीं. तीस वर्षांचे मुदतींत ते एकदां सुद्धां यवतेश्वरास किंवा सज्जनगडावर गेले नाहींत. कधीं वाईक्षेत्रांतील निरनिराळीं देवस्थानें पहावीं असेंहि त्यांच्या मनांत आलें नाहीं. सातार्‍यांतील तरी सारीं देवळें त्यांनीं पाहिलीं असतील असें वाटत नाहीं.

तसेंच सद्गुरूंची उपासना घेतल्यावर त्यांच्या शब्दापलीकडे त्यानां शास्त्र उरलें नाहीं. त्यांची श्रद्धा इतकी निस्सीम असे कीं, त्याला युक्तिवादाची कधींच गरज भासली नाहीं. आपल्या श्रद्धेच्या पालनांत आपलें वर्तन क्वचित् उपहासास्पद होतें, याचीहि त्यांनीं कधीं परवा केली नाहीं.

काकांच्या भाषणांत कधीं कोणाची निंदा आली नाहीं. कोणत्याहि साधूची गोष्ट कोणी त्यांना सांगितली तर ते सांगणाराचा बुद्धिभेद होईल असें कधींच बोलत नसत. त्यांना कोणी सद्गुरु, साधु, साक्षात् ईश्वरच, असें गौरवपर म्हणूं लागले तर ते त्याचा निषेध सौम्य शब्दांत करीत. 'तुम्ही जो रघुनाथ म्हणतां तो हृदयस्थ रघुनाथ वेगळा तो मी नव्हे.' तसेंच 'सद्गुरु ते वेगळे' असें सांगून आपल्याकडे कोणतीच महंती ते कधींच येऊं देत नसत. आपल्याकरितां दुसऱ्याला यत्किंचित तसदी पडूं नये, यासाठीं ते जपत. त्यांच्या जवळपास बसलेले भक्त त्यांची आपण होऊन पादसंवाहनादि सेवा करीत, त्याचा त्यांनीं निषेध केला नाहीं. पण त्यांना एखादी जवळचीहि वस्तु हवी असली तर 'ती द्या बरं' असें त्यांनीं कधीं कोणाला सांगितलें नाहीं. ते स्वतः उठून ती आणीत. अशा त्यांच्या सदाचारांतील अनेक लहानमोठ्या गोष्टी सूक्ष्म दृष्टीच्या मनुष्याला दिसून येत. यामुळें त्यांच्याबद्दल पाहणाराचे मनांत विलक्षण प्रेमादरभाव उत्पन्न होई.

**सुविमल दिनचर्या ही तुझी जो पढून ।**
**मनन करिल तीचें प्रेम चित्तीं धरून ॥**
**अनवरत तयाला भक्ति तूझी अनन्य ।**
**जडुन जगतिं होवो तो, महाराज, धन्य ॥**

श्रीचरित्र.





# प्रकरण २२ वें.

## संतांचा सद्विचार.

म्हणोनी हा विचार करावा। सत्यमार्ग तोचि धरावा।
लाभ जाणोनी घ्यावा। विवेकाचा॥ ११।४।२१ दा. बो.

श्रीसद्गुरु समर्थ काकामहाराज पुराणिक हे अध्यात्मरामायण ह्या आपल्या उपासना ग्रंथांतील अध्यायांचा अर्थ सांगतांना तन्निमित्त अगदीं जरूरीपुरती जी अध्यात्मचर्चा करीत तेवढीच. एरव्हीं ते कधींच वेदान्तचर्चा फार करून कोणाजवळ करीत नसत. श्री रामकृष्ण परमहंसांच्या सुलभ वेदांताप्रमाणें काकांची शिकवण फारच साधी असे. त्यांनीं योगयागादि प्रक्रिया कधीं कोणास सांगितली नाहीं. किंवा प्रस्थानत्रयींतील घटपटादि विचारहि ते कधीं कोणाजवळ सांगत बसले नाहींत. भाव-श्रद्धा-भक्ति (भक्तिश्रद्धाभावसमेतैर्भजनीयं। अ. रा. यु. कां १३।१५) एक ग्रंथपठण आणि नामस्मरण हाच त्यांचा परमार्थमार्ग. खरें भक्तिप्रेम प्राप्त झाल्यावर जें मिळवावयाचें तें मिळविलें, असेंच ते मानीत. भक्तिप्रेमासाठीं करवेल तितकें एकांतिक गुप्त भजन करावें असें ते सांगत. त्यांच्याकडे येणारा वर्ग बहुतेक सर्व प्रापंचिकच असे. येणारे लोक कांहीं संकटनिरसनार्थच बहुधा येत असत. त्यांस काका निरनिराळीं कामनिक व्रतें सांगत. पण तीं पिंपळाला, किंवा मारुतीला प्रदक्षिणा घालणें, सूर्याची प्रतिमा ताम्ह-

नांत काढून त्याची पूजा करणें, त्यास प्रदक्षिणा घालणें, गुरुचरित्रादि ग्रंथ वाचणें इत्यादि फार साधीं व बिनखर्चीचीं असत. मांसाहारी मनुष्यास व्रतस्थ असतांना घरांत मांसाहाराची ते सक्त बंदी करीत. याशिवाय त्यांच्यां व्रतपालनांत दुसरें पथ्य, कष्ट, अगर दगदग कांहीं नसे. जे त्यांचे सांप्रदायी असत त्यांनीं तर कोणत्याहि हेतूस्तव त्यांच्या नित्य-उपासनेपलीकडे कोणतेंच व्रत करावयास नको, व कोठेंच जावयास नको, असें ते निक्षून सांगत. सर्व संकटपरिहार एका उपासनेंत आला. यास्तव उपासनाच वाढवावी असें ते म्हणत. तीहि उपासना हट्टानें उगाच जास्त वाढविणें त्यांस पसंत नसे. तसेंच आपलें उपासनाकर्म आपल्या नित्याच्या प्रापंचिक कर्मांत फारसें आड येऊं देऊं नये, यावरहि त्यांचा विशेष कटाक्ष असे. 'अंतस्त्यागी बहिःसंगी' हेंच त्यांच्या शिकवणीचें मर्म असे.

ईश्वरानें जीं मुलेंमाणसें आपल्या स्वाधीन केलीं आहेत, त्यांचा प्रापंचिकांनीं योग्य तो संभाळ केला पाहिजे. चरितार्थासाठीं जे उद्योग करावयाचे ते वेळचेवेळीं बरोबर करून राहिलेल्या वेळांत, पहांटे व रात्रीं देवाचें भजन, पूजन, जप व उपासना-ग्रंथपठण हीं कृत्यें निर्वेध एकांतांत करावीं, अशी त्यांची शिकवण असे. उपासनेंत दंभच काय पण मनोवृत्तींत अभिमानाचा लेशहि असतां कामा नये व दुसऱ्याला उपसर्ग पोहोंचूं नये, यावर त्यांचा अति कटाक्ष असे.

परमेश्वरप्राप्ति ही गोष्ट अति अवघड आहे, ती एका जन्मांत प्राप्त होणें अत्यंत कठीण आहे. परमेश्वराची सेवा व भक्ति आपण करूं म्हटल्यानें ती घडतेच असें नाहीं. ती ईश्वरानें घडवून घेतली तरच घडेल. यास्तव ईश्वराला शरण जावें. त्याचें भजन करावें, त्याच्या नामांत बुडून राहावें. त्याला करुणा येईल, तेव्हां तो योग्य तें करीलच. त्यासाठीं त्याची वेगळी प्रार्थना करण्याची गरज नाहीं. उपासना-

ग्रंथपठणानें पापक्षालन होऊन चित्तशुद्ध होत जातें. नामस्मरणानें ईशप्रेम उत्पन्न होतें. ज्या ग्रंथाच्या अखेर पठणाची फलश्रुति सांगितलेली असते, असेच ग्रंथ पठणास घ्यावे. त्यांच्या दीर्घकालच्या पठणानें बुद्धि शुद्ध झाली तरच वेदान्त ग्रंथाचें खरें रहस्य कळेल. एरव्हीं कळणार नाहीं. यास्तव अनधिकाऱ्यांनीं वेदान्ताचे भक्तिहीन शब्दावडंबरांत पडूं नये. जास्त ग्रंथ वाचल्यानें उगाच कुशंका वाढतात. यासाठीं जास्त वाचूंच नये, असा त्यांचा उपदेश असे. तसेंच पठणाच्या ग्रंथाचा अर्थ न समजला तरी चालेल. तो समजून घेण्याचा प्रयत्नहि करावयास नको. दीर्घकालच्या केवळ नित्यअखंडित व पद्धतशीर पठणानें अर्थ आपोआप कळूं लागतो, असें ते सांगत. अशा रीतीनें एक ग्रंथ समजला म्हणजे समजावयाचें तें सारें समजलें असें होत असल्यामुळें, एक ग्रंथ, एक नाम, व एक इष्टदैवत अशी बळकट निष्ठा असावी, हें त्यांच्या उपदेशाचें सार होय.

अध्यात्मरामायण, भगवद्गीता, भागवत, शिवलीलामृत, रामविजय, गुरुचरित्र, यांपैकीं कोणत्या तरी ग्रंथाचें नित्य पठण करण्यास ते सांगत. पठण अत्यंत सावकाश व स्पष्ट, नेत्र, वाणी व श्रवण यांची एकधारा अखंड ठेवून करावें यावर त्यांचा फार कटाक्ष असे. ग्रंथ पाठ झाला असला तरी प्रत्येक अक्षर डोळ्यांनीं पाहिल्यावांचून त्याचा उच्चार करूं नये, अशी त्यांची पठणाची शिस्त असे.

प्रपंचत्याग त्यांनीं कधींच कोणास सांगितला नाहीं. पण कामना सोडावी, अहंकार निर्मूल करावा, मुलांबाळांचे लाड करून त्यांच्यावरील मोह वाढवूं नये, अशा प्रकारच्या त्यांच्या सूचना असत. प्रारब्धभोग भोगल्यावांचून सरत नाहीं. यासाठीं ज्ञात्यानें त्यासाठीं ईश्वराला संकट घालूं नये. मात्र ईश्वरानें मनांत आणलें तर त्यास अशक्य कांहींच नाहीं. त्याच्या इच्छेस प्रारब्धहि आड येणार नाहीं.

दैव पंगू आहे त्यास उद्योगाची जोड पाहिजे, असें ते सांगत. लोकमान्य टिळकांसारखे लोकसंग्रहकारी कर्मयोगी यांची योग्यता विशेष आहे असें ते मानीत. तथापि सामान्य व्यक्तींनां शास्त्रीय उपासना-कर्माचें जें महत्त्व आहे, त्याची भरपाई लौकिक परोपकारी कर्मांनींहि होणार नाहीं, असें त्यांनीं या चरित्राचे नायकास सांगितल्याचें मागें सांगितलेंच आहे.

काकांचा असा हा सुलभ व साधा वेदान्त असला तरी अध्यात्म-शास्त्रांत ते निष्णात होते. ते श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ असेच होते. एका अध्यात्मरामायणांतहि भक्तीबरोबर अध्यात्म ठिकठिकाणीं सांगितलेंच आहे. त्या अध्यात्मरामायणांतील, रामगीता, रामहृदय असे कांहीं विशेष अध्यात्मपर अध्याय काकांच्या विशेष आवडीचे होते. अर्थात्, त्यांच्या सभोंवार असलेल्या सामान्य प्रापंचिकांचा अनधिकार जाणून ते अध्यात्मचर्चा करीत नसले, तरी त्या विषयाचें अनन्यसाधारण महत्त्व ते मानीतच होते. यास्तव या चरित्रग्रंथाचे पूर्ततेकरितां मागील प्रकरणांत सुरू केलेल्या श्रीमदाचार्यांच्या सदाचारावरील ओवीबद्ध टीका-ग्रंथाचे आधारें अध्यात्मशास्त्ररहस्य पुढें थोडक्यांत देत आहें.

परोक्षज्ञान ही अपरोक्षानुभूतीची एक पायरी आहे. अध्यात्मशास्त्र समजून घेणें हें गृहस्थाश्रमांतील एक अवश्य कर्तव्यच आहे. अध्यात्मविषय समजून घेतल्यानंतर मग सद्गुरूंस शरण जावें, असेंहि सद्-ग्रंथांतून लिहिलेलें आढळतें. आपल्या चरित्र नायकाची धर्मविषयक व उपासनाविषयक भावना पडताळून पाहण्यासाठीं अध्यात्म विषयाची स्थूल कल्पना येथेंच नमूद केलेली असणें अगत्याचें आहे. त्यानें तुलनात्मक विचार करण्यास मदत होईल. कर्मयोग, भक्तियोग, आणि ज्ञानयोग यांतील तारतम्य अजमावितां येईल. तसेंच वाचकांच्या आवडीप्रमाणें व अधिकाराप्रमाणें. त्यांनीं यांपैकीं कोणता मार्ग

स्वीकारावा याचाहि विचार करण्यास त्यास थोडीशी मदत होईल, अशी आशा आहे.

**अतीतानागतं किंचिन्न स्मरामि न चिंतये ।**
**रागद्वेषं विना प्राप्यं भुंजाम्यत्र शुभाशुभम् ॥ १५ ॥**

मागील झालें न स्मरतां । होणार काय न चिंतितां । रागद्वेषाविण येथें प्राप्ता । भोगितों शुभाशुभ ॥ ६५१ ॥ संचित ज्ञानें जळालें । अहंतेविण क्रियमाण गेलें । प्रारब्ध देहाशीं उरलें । भोगमात्रें निमे ॥ ६५३ ॥ देहचि आपण नव्हे । तरी प्रारब्ध कोठें आहे । देह निमालें कीं राहे । त्या संबंध नसे ॥ ६६४ ॥ आत्मा देहरूप होईना । देहासी प्रारब्ध सोडीना । देहाचें रूपचि हें जाणा । प्रारब्ध कर्म ॥ ६५ ॥ प्राप्त तितुकें करावें । अप्राप्त तितुकें त्यागावें । केलें तें आतां न स्मरावें । होणार न चिंती ॥६९६॥ बाळ नेणपणें कनिष्ट । ज्ञाता सर्वज्ञत्वें वरिष्ठ । उभयांसी नाहीं कचाट । विधि निषेधाचें ॥ ७०१ ॥ प्रारब्धभोगाचें अक्षर । पुसी कोण पुरुषार्थी नर । मागें झालें पुढें होणार । कर्मगती वर्तती ॥ ६ ॥ प्रारब्ध नासूं म्हणतां कोडें । तरी जनकादि काय वेडे । जो ज्या क्षणीं भोग आतुडे । समानत्वें भोगिती ॥ ७ ॥ चक्र जैसें फिरविलें । उजवें डावें फिरे उगलें । तैसें हें कर्माचें प्रेरिलें । त्या रीतीं वर्ते ॥८॥ चक्राचें भ्रमण पुरे । तरी आपेंआप थिरे । प्रारब्ध भोगेनियां सरे । मग देह कैचा ॥ ९ ॥ कैंचे संचित क्रियमाण । कैंचे प्रारब्धीं वर्तन । कैंचे असे पापपुण्य । पूर्ण ब्रह्म ॥ १७ ॥ कैंचा ग्राम कैंचा देश । कैंची स्त्री कैंचा पुरुष । कैंचा काम कैंचा विलास । पूर्ण ब्रह्म ॥ ६१९ ॥...तस्मात् मागें झालें पुढें होणार । तें तें ब्रह्मचि चिन्मात्र । मध्येंहि जो जो भोगमात्र । निजांगें ब्रह्म ॥ ६४४ ॥...काया वाचा आणि मन । सेवेसीं केलें अर्पण । आतां माझें हें म्हणतां आण । श्रीसद्गुरुची ॥ ७९ ॥

**अभयं सर्वभूतानां ज्ञानमाहुर्मनीषिणः ।**
**निजानंदे स्पृहा नान्ये वैराग्यस्यावधिर्मतः ॥ १६ ॥**

निर्भयता सर्व भूतांची । ज्ञाते बोलती हेंची । अवधि जाणा वैराग्याची । ब्रह्मीं स्पृहा अन्य नसे ॥ ८६५ ॥ भूत म्हणजे झालें । भ्रमें करून उद्भवलें ।

मायादि नामरूप जेतुलें । जीवेशांसह ॥ ८६६ ॥ इतुक्यांचें असतां भय । तें ज्ञानही न होय । म्हणोनि बोलिजे निर्भय । ज्ञान तेंचि ॥ ६७ ॥ जें जें दिसे भासे । शून्यासहित सर्व नासे । कालही भय पावतसे । महाकालाचें ॥ ८७५ ॥ असो· हें सर्व भयरूप । निर्भयत्व नसे अल्प । एक जाणिजे स्वस्वरूप । अद्वय जे कां ॥ ८७६ ॥ तस्मात् निर्भय ब्रह्मरूप । तेंचि ज्ञात्याचें स्वरूप । सर्व भूतांचें आपेंआप । अभय आलें ॥ ८२ ॥ पूर्ण ज्ञाते ऐसें बोलती । हेचि ज्ञानाची चरम स्थिति । या वीण अन्य जें म्हणती । तें विपरीत ज्ञान ॥ ८३ ॥ नामरूप त्यागावें । अंगें ब्रह्मचि होआवें । स्वानुभवें तृप्ती पावावें । स्पृहा ऐसी ॥ ८५ ॥ ऐशिया वैराग्यावीण । कदा न राहे ब्रह्मज्ञान । आणि पूर्ण नसतां ज्ञान । वैराग्यही नव्हे ॥ ८९१ ॥ तस्मात् ज्ञान वैराग्य· दोन्ही । एकमेकां साह्यपणीं । जैसे अंधपंगू मिळोनी । मार्ग चालती ॥ ८९२ ॥ ब्रह्मज्ञान होय कैसें । आक्षेपिसी जरी ऐसें । तरी श्रवणमननेंविण नसे । साधन दुसरें ॥ ८९९ ॥

**वेदांतैः श्रवणं कुर्यान्मननं चोपपत्तिभिः ।**
**· योगेनाभ्यसनं नित्यं ततो दर्शनमात्मनः १७ ॥**

वेदांतें करावें श्रवण । दृष्टांत युक्तीनें व्हावें मनन । योगें नित्य निदिध्यासन । तेव्हां भेटी आपुली ॥ ९०० ॥ हें ब्रह्म प्रत्यक्ष कळावें । नामरूप-मिथ्या स्वभावें । कांहीं जाणणें न उरावें । या नांव श्रवण ॥९१५॥ ब्रह्मचि सत्य आपण । जगजीव मिथ्या संपूर्ण । इतुकें सर्वदा अनुसंधान । स्मरण रूपें ॥ ९२२ ॥ स्मरण जेथून उद्भवतें । पुन्हां जेथें लया जातें । निश्चयें आपण तेंचि तें । अखंडता ऐसी ॥ ९२३ ॥ नको प्राणाची निरोधता । नको मनाची स्तब्धता । दिसे भासे त्या त्या आंतौता । आपणचि वाटे ॥९२४॥ हाचि येथें योगाभ्यास । द्वैताचा नव्हे उमस । पूर्ण ब्रह्म एकरस । तिसरें साधन ॥ ९२५ ॥ मन वाणी मुरडे जेथें । शब्द प्रवृत्ति कैसी तेथें । तरी सांगावें सद्गुरुनाथें । अपरोक्ष कैसेनि ॥ ९३३ ॥

**शब्दशक्तेरचिंत्यत्वाच्छब्दादेवापरोक्षधीः ।**
**सुषुप्तः पुरुषो यद्वच्छब्देनैवानुबुद्ध्यते ॥ १८ ॥**

शब्दाची अचिंत्य रचना । शब्देंचि पावे अपरोक्ष ज्ञाना । जैसा निजेला पुरुष जाणा । शब्दें जागा होय ॥ ९३५ ॥ शब्दचि सृष्टीशीं मूळ । नामरूपें

निर्मी सकळ । तोचि तयासी होय काळ । ज्ञानोदयीं ॥ ९३६ ॥ दशम आपण विसरला । नवांतें मोजिता झाला । म्हणे दहावा नदींत मेला । कोठें न दिसे ॥ ९४० ॥ नाहीं न दिसे दोहीं परी । हेंचि आवरण अंतरीं । दोनी दोहींतें संहारी । परोक्षापरोक्ष ॥ ४१ ॥ ब्रह्म हें सच्चिदानंद । आहे ऐसा बोलतां शब्द । तेणें नव्हेचि अभेद । अपरोक्ष ज्ञान ॥ ४६ ॥ तूंचि ब्रह्म स्वयें अससी । महा वाक्याची प्रवृत्ति ऐशी । गुरुमुखें ऐकतां आपैसी ॥ अपरोक्षता बाणे ॥ ९४७ ॥

**आत्मानात्मविवेकेन ज्ञानं भवति निर्मलम् ।**
**गुरुणा बोधितः शिष्यः शब्दब्रह्मातिवर्तते ॥ १९ ॥**

आत्मानात्म विवेकें करून । तत्काळ होय निर्मल ज्ञान । गुरूनें शिष्य बोधितां जाण । शब्द लंघून अर्थ पावे ॥ ९५४ ॥ सांडी म्हणूं तें सांडावें । मिथ्या मिथ्यात्वें त्यागावें । ऐसें नेतिमुखें समजावें । स्वरूप आपलें ॥ ९९० ॥ जेथवरी मर्यादाभूमी । तेथवर बोलिजे आम्हीं । एकरूप होतां संगमीं । बोलणें कैचें ॥ ९९५ ॥ तेथें आम्ही ढकलून देऊं । मग तुझा तूं जाणें अनु-भवू । त्याचक्षणीं उत्तीर्ण होऊं । तुझिया ऋणें ॥ ९९७ ॥

**न त्वं देहो नेंद्रियाणि न प्राणो न मनो न धीः ।**
**विकारित्वाद्विनाशित्वाद्दृश्यत्वाच्च घटो यथा ॥ २० ॥**

तूं देह नव्हेसी दृश्य । इंद्रियें प्राण पावती नाश । विकारी मन बुद्धि नव्हेस । घटाचे परी ॥ ९९९ ॥ तस्मात् सच्चिद्रूपासी । विकारामाजी ओळखीं त्यासी । असज्जडदुःखात्मकासी । सांडीं परतें ॥१०८१॥ सद्रूप तरी दिसेना । परी त्यावीण हें भासेना । भासासी मूळ कल्पना । परी तें झालेंचि नाहीं ॥ ११२० ॥ जें मुळींचि झालें नाहीं । रज्जू वरील जैसा अही । आहे तें स्वरूपचि पाहीं । अस्तित्वरूप ॥ ११२१ ॥

**विशुद्धं केवलं ज्ञानं निर्विशेषं निरंजनम् ।**
**यदेकं परमानंदं तत्त्वमस्य द्वयं परम् ॥ २१ ॥**

विशुद्ध केवळ ज्ञानघन । निर्विशेष जो निरंजन । एकचि परमानंद पूर्ण । तें तूं अससी अद्वय ॥ ११२६ ॥ साखरे वेगळी गोडी । रसस्वादनीं निवडी ।

तेसें वृत्तीमधून काढीं । स्वानुभवें ज्ञान ॥ ११३० ॥ शब्दस्पर्श टाकावे । रूप रसादि त्यागावे । नुसतें ज्ञान अनुभवावें । विशुद्ध जें कां ॥ ११३२ ॥ शब्द जेणें ओळखिला । स्पर्शादि प्रत्यय होय त्याला । विषयभेद मात्र झाला । परी ज्ञान अभेद ॥ ११३८ ॥ जो कां वृत्तीसी जाणे । तोचि आत्मा ओळखणें । परी वृत्ति विकार त्यागणें । वृत्ति असतांचि ॥ ११६४ ॥ एवं वृत्तीवीण आनंद-घन । स्वानुभूति तेंचि ज्ञान । सर्वदा असे परिपूर्ण । सद्रूपहि तेंचि ॥ ११८५ ॥ सत् आच्छादी जरी भ्रम । तरी कोठें उद्भवे रूपनाम । चिद्रूप आच्छादितां धर्म । ज्ञान क्रिया कैंची ॥ ११८८ ॥ आनंद मात्र विकारांत । आच्छादिल्या परी वाटत । तोही सुषुप्तीमाजी प्रगटत । अनायासें ॥ ११८९ ॥ वृत्तितरंग सांडावा । दुजा उद्भवचि न व्हावा । तत्क्षणीं पावे अनुभवा । निजात्म-सुखाचे ॥ ११९९ ॥

**शब्दस्याद्यंतयोः सिद्धं मनसोऽपि तथैव च ।**
**मध्ये साक्षितया नित्यं तदेव त्वं भ्रमं जहि ॥ २२ ॥**

जो शब्दाचे आदिअंतीं । मनाच्याही तेणेंचि रीतीं । मध्यें साक्षी नित्य निश्चितीं । तेंचि तूं हा टाकीं भ्रम ॥ १२३९ ॥ शब्द मन उपलक्षण । परी जीं जीं तत्त्वें निर्माण । त्या त्या आदि अंतीं पूर्ण । मध्येंहि साक्षिरूपें ॥ १२४९ ॥ वायु मेघाचिये गती । भंगेना गगनाची स्थिति । तैसे विकार जे होती जाती । तूं जैसा तैसा ॥ १२५० ॥ आतां ज्ञान जालियावरी । विकास लाविसी निर्विकारीं । हाचि भ्रम गा निर्धारीं । पूर्ण ज्ञान नव्हे ॥ १२५२ ॥ अगा सांडीमांडी करूं जासी । तों तों विकारा पावसी । निजरूपीं भिन्न पडसी । समाधान कैंचें ॥ १२५६ ॥ ज्वाले सहित अग्नी । कीं तरंगासहित पाणी । तैसा तूं आपणा लागूनी । जाणें वृत्तीसहित ॥ १२६१ ॥ एक देहाचा मासला । तुजसीं आत्मत्वें दाविला । तैसेंच ब्रह्मांड देखें वहिला । आपुलिये ठायीं ॥ १२६३ ॥

**स्थूलवैराजयोरैक्यं सूक्ष्महैरण्यगर्भयोः ।**
**अज्ञानमाययोरैक्यं प्रत्यग्विज्ञानपूर्णयोः ॥ २३ ॥**

स्थूल विराट एक रीतीं । सूक्ष्म हिरण्यगर्भाप्रति । ऐक्य अज्ञान प्रकृती । प्रत्यग–विज्ञान पूर्णासी ॥ १२६६ ॥ एवं पिंड ब्रह्मांड दोहींचें । वाच्यांशीं समानत्व साचें । असतां लक्ष्यांशीं कैचें । भिन्नत्वपण ॥ १२८१ ॥

**चिन्मात्रैकरसे विष्णौ ब्रह्मात्मैकस्वरूपके ।**
**भ्रम एव जगज्जातं रज्ज्वां सर्पभ्रमो यथा ॥ २४ ॥**

विष्णु चिन्मात्र एकरस । प्रत्यगात्मा ब्रह्म अविनाश । ऐशिया तुझ्या ठायीं भ्रमविलास । रज्जु सर्पापरी झाला ॥ १२९६ ॥ हा पूर्वपक्षाचा सिद्धांत । हा बद्ध हा जीवन्मुक्त । हा साधक हा मोक्ष इच्छित । ऐसें भावूंचि नको ॥ १३१० ॥ गगनाचि जैसे गगनीं । कीं पाणिया माजी पाणी । तैसा तूंचि एक एकपणीं । अससी ब्रह्म ॥ १३११ ॥ तूंचि आंत तूंचि बाहेरी । तूंचि तळीं तूंचि उपरी । तूंचि पुढें मागें एकसरी । सव्य अपसव्य तूं ॥२३१२॥

**तार्किकाणां च जीवेशौ वाच्यावेतौ विदुर्बुधाः ।**
**लक्ष्यौ च सांख्ययोगाभ्यां वेदांतैरैक्यतानयोः ॥ २५ ॥**

जीवेश वाच्य बोले न्याय । सांख्ययोगें लक्ष्य प्रत्यय । वेदान्त ऐक्यत्व निश्चय । जाणती ज्ञाते ॥ १३२५ ॥

**कार्यकारणवाच्यांशौ जीवेशौ यौ जहच्च तौ ।**
**अजहच्चौ तयोर्लक्ष्यौ चिदंशावेकरूपिणौ ॥ २६ ॥**

वाच्यांश कार्यकारणांचा । त्याग करून जीवेशांचा । अत्याग एकरूपीं लक्ष्याचा । चिदंश म्हणोनी ॥ १३३७ ॥

**कर्मशास्त्रे कुतो ज्ञानं तर्के नैवास्ति निश्चयः ।**
**सांख्ययोगौ द्विधापन्नौ शाब्दिकाः शब्दतत्पराः ॥ २७ ॥**

कर्मशास्त्रीं कैंचे ज्ञान । तर्कीं निश्चय नव्हे जाण । सांख्ययोगासी भेद-भान । व्याकरण शब्दीं तत्पर ॥ १३६२ ॥

**अन्ये पाखंडिनः सर्वे ज्ञानवार्तासु दुर्बलाः ।**
**एकवेदांत विज्ञानं स्वानुभूत्या विराजते ॥ २८ ॥**

अन्य पाषांडी दुर्बल । ज्ञानवार्तेचा त्यां दुष्काळ । एक वेदांत विज्ञान केवळ । स्वानुभूतीनें विराजे ॥३॥ शैव शाक्त वैष्णव । सौर गाणपत्य सर्व । जयांसी एकदेशी देव । ते ते पाखांडी ॥ १४०६ ॥ हें असो अधिकारावीण। करिती जे का वेदांत श्रवण । मुखें बडबडिती ज्ञान । तेही पाखांडी ॥१४१३॥ सर्व शास्त्रांही सांडावें । आणि लौकिकाही त्यजावें । सर्वही स्वयेंचि व्हावें । निजांगें ब्रह्म ॥ १४२३ ॥

**अहं ममेत्ययं बंधो नाहं ममेति मुक्तता ।**
**बंधो मोक्षो गुणैर्भाति गुणाः प्रकृतिसंभवाः ॥ २९ ॥**

मी माझें हें बंधन । मुक्ति तेचि ययावांचून । बंधमोक्षां गुण कारण । गुण तरी प्रकृतीचे॥१४४३।।मी माझें असें जोंवरी। मुमुक्षुत्व जाणावें तोंवरी । अहंममता निर्मूळ जरी । होतां मुमुक्षुत्व राहिलें ॥ १५२६ ॥ पुढें तया नांव साधक । ध्येयध्यानरूपें कौतुक । तेंहि निमोनि होय एक । निजांगें ब्रह्म ॥ १५२७ ॥

**ज्ञानमेकं सदा भाति सर्वावस्थासु निर्मलम् ।**
**मंदभाग्या न जानंति स्वरूपं केवलं बृहत् ॥ ३० ॥**

अवस्था तिन्ही एकलें ज्ञान । निर्मळ निजस्वरूप पूर्ण । केवळ सदा भासमान् । मंदभाग्य न जाणती ॥ १५३४ ॥

**संकल्पसाक्षिणं ज्ञानं सर्वलोकैकजीवनम् ।**
**तदस्मीति च यो वेद स मुक्तो नात्रसंशयः ॥ ३१ ॥**

संकल्प साक्षी जें ज्ञान । हेंचि सर्व लोकांचें जीवन । तेंचि मी जया बाणे खूण । निःसंशयी मुक्त तो ॥ १५४६ ॥ वृत्तीसहित ज्ञान स्फुरे । ते जीवन्मुक्ति निर्धारें । वृत्तिवीण समाधान बारे । विदेह स्थिति ते ॥ १५५३ ॥

**प्रमाता च प्रमाणं च प्रमेयं प्रमितिस्तथा ।**
**तस्य भासावभासेत मानं ज्ञानाय तस्य किम् ॥ ३२ ॥**

प्रमाता प्रमेय प्रमाण । आणि तयातें वसतें स्थान । हें ज्याचे भासाभासमान । त्यासी प्रमाण कासया ॥ १५६२ ॥ एवं अंतःकरण प्रमाण । जीव तो

प्रमाता जाण । प्रमेय तें विषय संपूर्ण । शब्दस्पर्शादि ॥ ६६ ॥ ऐसे प्रमाण प्रमाता । प्रमेय प्रमिति जेणें सत्ता । भासती प्रकाशें तत्त्वतां । जयाचेनि ॥६७॥ तो हा आत्मा ज्ञानघन । सर्वांसी जाणता हे आपण । तयासी नेणतीच संपूर्ण । जडरूप तत्वें ॥ १५६९ ॥

**अर्थाकारा भवेद्वृत्तिः फलेनार्थः प्रकाशते ।**
**अर्थज्ञानं विजानाति स एवार्थः परः स्मृतः ॥ ३३ ॥**

वृत्ति होतां विषयाऐशी । जीव तयातें प्रकाशी । स्वप्रकाशें जाणे तिहींशी । अर्थ तोचि परमात्मा ॥ १५७२ ॥ जो जो विषय येतां समोर । वृत्ति व्यापी तदाकार । फेडोनि अज्ञान अंधःकार । जीवें स्फुरे अमुक ऐसें ॥ ७३ ॥ वृत्तीसी ज्ञान स्फुरेना । तरी जीव पाहिजे विषय ज्ञाना ॥ प्रतिबिंब न पडे वृत्तिविना । तरी वृत्तिही पाहिजे ॥ ७४ ॥ तस्मात् प्रतिबिंबयोगें वृत्ती । सर्व विषयांसी निवडिती । सामान्य प्रकाश आदि अंतीं । वृत्ति उद्भव-लयाच्या ॥ ७९ ॥ जों जों जाणो जाय ज्ञाता । तों तों वेगळा पडे तत्त्वतां । जाणणें नेणणें त्यागितां । तोचि आत्मा आपण ॥ ८७ ॥

**वृत्तिव्याप्यत्वमेवास्तु फलव्याप्तिः कथं भवेत् ।**
**स्वप्रकाशस्वरूपत्वात्सिद्धत्वाच्च चिदात्मनः ॥ ३४ ॥**

स्वरूपीं असो वृत्तिव्याप्ति । परी काज नसे जीवाप्रति । चिदात्मा स्वप्रकाश संविति । सहज सिद्ध असतां ॥ १५९४ ॥ पाणियावरी चक्र उमटे । अमर्याद धांवे नेटें । तैसें वृत्तीसीं स्वरूप भेटे । तेव्हां होय त्या ऐशी ॥ ९७ ॥ चक्र जैसें वितळून जातां । पाणी पाणीपणें तत्त्वतां । तैसा वृत्तीशीं लय होतां । मग आत्माचि उरे ॥ ९८ ॥ ऐसी वृत्तीची व्यापकता । बाध नसे अंगीकारितां । परीं जीवरूपें जो प्रमाता । न लगे व्याप्तीसी ॥ १६०० ॥ चक्षु दिवा मिळे जरी । घटाचें रूप दिसे तरी । दीप पहावया निर्धारी । चक्षुचि एक पुरे ॥ १६०२ ॥ सूर्यप्रकाशीं जैसा दीप । प्रकाश करीना अल्प । तेवीं जीवाचें प्रतिबिंबरूप । मुख्यबिंबींच मिळे ॥ १६०५ ॥ जों काळ मुख्य बिंबाहूनी । वेगळें असतां पाणी । प्रतिबिंबाची झडपणी । दिसे तों-वरीच ॥ १६०६ ॥ वृत्ति योजितां निर्विकारीं । अज्ञानाची होय बोहरी ।

तेही होऊन स्वरूपाकारीं । वितुळे तत्क्षणीं ॥ ११ ॥ पुढें उत्थानकाळीं वृत्ती। त्याचि सुखा अनुभविती । हेचि जाणावी जीवन्मुक्ति । वासनानंदरूपें ॥ १५ ॥

**अर्थोदर्थे यथा वृत्तिर्गतुं चलति चांतरे ।**
**अनाधारा निर्विकारा या दशा सोन्मनी स्मृता ॥ ३५ ॥**

उभय विषयांचें अंतर । मध्यसांधि निर्विकार। जे वृत्तिदशा अनाधार। ते उन्मनी बोलिजे ॥ २४ ॥ पाहिला विषय टाकिला । दुजा जोंवरी नाहीं घेतला । तया अनाधार वृत्तीला । उन्मनी ओळखिजे ॥ २७ ॥ तैसेंचि ज्ञात्याचें मन। उमसूं न लाहे भिन्न । तया उन्मनीतें अभिधान । विदेह स्थिति ॥३१॥ जो निश्चय जीवन्मुक्ताचा । तोचि निश्चय असे याचा । परी सविकल्प निर्विकल्पाचा । मात्रचि भेद ॥ ३२ ॥ विश्व हें आहे कीं नव्हे । वृत्ती गेली कीं उद्भवे । हें जयासी नाहीं ठावें। ते विदेह स्थिति ॥ ३३ ॥

**चित्तं चिच्च विजानीयात्तकाररहितं यदा ।**
**तकारो विषयाध्यासो जपारागौ यथा मणौ ॥ ३६ ॥**

ज्या क्षणीं तकार लोपे । त्याक्षणीं चित्त चिद्रूपें । तकार विषयाध्यास रूपें । स्फटिकीं जेवीं रक्तपुष्प ॥ ४७ ॥ पाणि याचेंचिं अंग । नाम पावलें तरंग । तेवीं आत्मा हा असंग । नानात्वें कल्पिला ॥ १६६० ॥

**ज्ञेयवस्तुपरित्यागाज्ज्ञानं तिष्ठति केवलम् ।**
**त्रिपुटी क्षीणतामेति ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ३७ ॥**

विषय मात्रांचा करितां त्याग । केवळ ज्ञान उरे मग । त्रिपुटीचा होतांचि भंग । अंगें ब्रह्म होतें ॥ ६४ ॥ पटीं ओळखावा तंतू । कापूस ओळखावा त्यांतू । तेवीं विषयामाजी चित्तू । ओळखावें आधीं ॥ १६७१ ॥

**मनोमात्रमिदं सर्वं चिन्मनो ज्ञानमात्रकम् ।**
**अज्ञानभ्रम इत्याहुर्विज्ञानं परमं पदम् ॥ ३८ ॥**

विश्व हेंचि असतां मन । संकल्पहीन तेंचि ज्ञान । विकार तो भ्रम अज्ञान । विज्ञान तें परम पद ॥ ८४ ॥ मन हें नांव आलें अंतरीं । जग नाम कल्पिलें बाहेरी । ऐशिया अज्ञान भ्रमपुरीं । वाहतचि गेलें ॥ ९५ ॥

**अज्ञानं चान्यथाज्ञानं मायामेतां वदंति ते ।**
**ईश्वरं मायिनं विद्यान्मायातीतं निरंजनम् ॥ ३९ ॥**

अज्ञान आणि अन्यथा ज्ञान । इतुकें मायेचें लक्षण । जाणिजे मायावी ईशान । निरंजन तया अतीत ॥ १७०३ ॥ या शब्दें हें इतुकें । भासताती नामरूपकें । ते नाहींच ऐसें कौतुकें । मा शब्देंचि बोले ॥ ७ ॥

**सदानंदे चिदाकाशे मायामेघस्ताडिन्मनः ।**
**अहंता गर्जनं तत्र धारासारो हि यत्तमः ॥ ४० ॥**
**महामोहांधकारेऽस्मिन्देवो वर्षति लीलया ।**
**अस्या वृष्टेर्विरामाय प्रबोधैकसमीरणः ॥ ४१ ॥**

चिदानंद शुद्ध गगन । तेथें माया मेघ वीज मन । अहंता हे मेघगर्जन । अज्ञान अंधकार ॥ ३३ ॥ महामोह अंधारांत । लीलेनें देव वृष्टि करीत । प्रबोध वायु जरी प्राप्त । तरी हे वृष्टि वितुळे ॥१७३४॥ सच्चिदानंद ब्रह्म सघन । शुद्ध ब्रह्म परिपूर्ण । शून्या वांचूनियां गगन । जें अखंड एकरस ॥ १७३५ ॥ सुख दुःखें द्वंद्वें अपार । पर्जन्यधारा पडती सैर । पापपुण्याचा महापूर । प्रवाह चालिला ॥ ४३ ॥ अहंतेच्या गर्जनें पुढें । जीव भ्रमून झाले वेडे । सच्छास्त्रशब्द कानीं न पडे । सहसा कांहीं ॥ १७४८ ॥

**ज्ञानं दृग्दृश्ययोर्भानं विज्ञानं दृश्यशून्यता ।**
**एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किंचन ॥ ४२ ॥**

दृश्य द्रष्टा भान तें ज्ञान । दृश्यशून्य तें विज्ञान । एक अद्वय ब्रह्म पूर्ण । अन्य किंचित् असेना ॥ १८०५ ॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं तज्ज्ञानं ज्ञानमुच्यते ।**
**विज्ञानं चोभयोरैक्यं क्षेत्रज्ञपरमात्मनोः ॥ ४३ ॥**

क्षेत्रक्षेत्रज्ञ जाणिजे । ययासी ज्ञान बोलिजे । विज्ञानें दोन्ही ऐक्य कीजे । क्षेत्रज्ञ परमात्मा ॥ १८१३ ॥

**परोक्षं शास्त्रजं ज्ञानं विज्ञानं चात्मदर्शनम् ।**
**आत्मनो ब्रह्मणः सम्यगुणाधिद्वयवर्जितम् ॥ ४४ ॥**

परोक्ष शास्त्रजन्य तें ज्ञान। आत्मदर्शन तें विज्ञान । आत्मा ब्रह्म हें अभिन्न। माया अविद्या निरसतां ॥ १८८५ ॥

**त्वमर्थो विषयज्ञानं विज्ञानं तत्पदाश्रयम् ।**
**पदयोरैक्यबोधस्तु ज्ञानविज्ञानसंज्ञकम् ॥ ४५ ॥**

मी आत्मा हेंचि ज्ञान। अहंब्रह्म तें विज्ञान। उभय ऐक्य जें समाधान। ज्ञानाविज्ञान दोन्ही ॥ १८३४ ॥

**आत्मानात्मविवेकस्तु ज्ञानमाहुर्मनीषिणः ।**
**अज्ञानं चान्यथा लोके विज्ञानं तन्मयं जगत् ॥ ४६ ॥**

आत्मानात्मविवेकाप्रती। ज्ञान ऐसें ज्ञाते बोलती। अज्ञान अन्यथा लोकरीती। विज्ञान तें सर्व ब्रह्म ॥ १८४० ॥

**अन्वयव्यतिरेकाभ्यां सर्वत्रैकं प्रपश्यति ।**
**यत्तु तद्वृत्तिजं ज्ञानं विज्ञानं ज्ञानमात्रकम् ॥ ४७ ॥**

अन्वय आणि व्यतिरेकानें। सर्वत्रीं एकचि पाहणें। ज्ञान तें वृत्तीशीं स्फुरणें। विज्ञान तें ज्ञानमात्र ॥ ४७ ॥ सोन्यावीण अलंकार नव्हे। मग तें सुवर्ण कां न म्हणावें। अलंकार असतांही पाहावें। सुवर्णचि ॥ ५३ ॥

**अज्ञानध्वंसकं ज्ञानं विज्ञानं चोभयात्मकम् ।**
**ज्ञानविज्ञाननिष्ठेयं तत्सद्ब्रह्माणि चार्पणम् ॥ ४८ ॥**

अज्ञान नाशितें ज्ञान। विज्ञान दोहींसी अधिष्ठान। हें ज्ञानविज्ञान निष्ठा अर्पण। एक परब्रह्मीं ॥ १८६१ ॥ प्रकाश आणि अंधकारा। दोहींसीही गगनआधारा। तेवीं ज्ञानाज्ञान विकारा। अधिष्ठान ब्रह्म ॥ ६९ ॥

**भोक्ता सत्त्वगुणः शुद्धो भोगानां साधनं रजः ।**
**भोग्यं तमोगुणः प्राहुरात्मा चैषां प्रकाशकः ॥ ४९ ॥**

भोक्ता ज्ञानशक्ति सत्त्वगुण। क्रियाशक्ति रजसाधन । भोग्य द्रव्यशक्ति तमोगुण। आत्मा यासी प्रकाशक ॥ १९१९ ॥ एवं वृत्ति, इंद्रिय, विषय। हाचि त्रिगुण समुदाय। आत्मा यासी प्रकाशमय । साक्षिमात्र ॥ २६ ॥ जैसा ठाणवईचा दिवा। तेणें प्रकाश मात्र करावा । घरींचा चोर कीं

परावा । नेणें सहसा ॥ २८ ॥ केवळ साक्षीच अलिप्त नसे । प्रतिबिंबादि भोग न दिसे । हें दृष्टांत मुखेंचि आपैसे । विवेकें कळे ॥ १९३० ॥ अग्निसंगें लोहतप्त । जडामध्यें अग्नि मिश्रित । लोहो घणें जेव्हां पिटित । तें दिसतें अग्नीसी ॥ ३१ ॥ परी जडाचा घाव जड । सोसूं जाणें तेंचि दृढ । प्रकाशासी तें अवघड । ओझें घेतां ॥ ३२ ॥ तेवीं सुखदुःखाच्याच कथा । वाजतीं वृत्तीच्या माथां । परी प्रतिबिंबासी सर्वथा । शीवतीच ना ॥ ३३ ॥ जळीं प्रतिबिंब देखिलें । तयासी काष्ठें जरी मारिलें । परी तें जीवनीं आदळलें । नातळे प्रतिबिंबा ॥ ३४ ॥ तस्मात प्रतिबिंबरूप जीवासी । भोक्तृत्वाची न वचे दशी । मग सामान्य जो प्रकाशी । तेथें कोठोनी ॥ ३५ ॥

देहबुद्धया तरी दास । जीवबुद्धया तुझा अंश । मीचि तूं हा अविनाश । आत्मबुद्धि जेव्हां ॥ ६२ ॥ ऐक गुरुभक्तीचें लक्षण । निपटून जावें मीपण । एक गुरूचि परिपूर्ण । भेदभान न होतां ॥ १९७५ ॥

**ब्रह्माध्ययनसंयुक्तो ब्रह्मचर्यरतः सदा ।**
**सर्वं ब्रह्मेति यो वेद ब्रह्मचारी स उच्यते ॥ ५० ॥**

तोचि ब्रह्मचारी बोलिजे । जेणें सर्व ब्रह्म जाणिजे । तेथेंचि अखंड विचारिजे । वेदाध्ययन युक्त ॥ ८८ ॥

**गृहस्थो गुणमध्यस्थः शरीरं गृहमुच्यते ।**
**गुणाः कुर्वंति कर्माणि नाहं कर्तेति बुद्धिमान् ॥ ५१ ॥**

शरीर गृहीं गुणीं स्थित । तोचि गृहस्थ बुद्धिमंत । गुणचि कर्मीं प्रवर्तत । आपण कर्ता असेना ॥ १९९३ ॥

**किमुग्रैश्च तपोभिश्च यस्य ज्ञानमयं तपः ।**
**हर्षामर्षविनिर्मुक्तो वानप्रस्थः स उच्यते ॥ ५२ ॥**

उग्र तपें करोनि काय । शुद्ध तप तें ज्ञानमय । हर्ष शोक गेले उभय । जंयाचे तो वनस्थ ॥ २००६ ॥

**देहन्यासो हि संन्यासो नैव काषायवाससा ।**
**नाहं देहो महात्मेति निश्चयो ज्ञानलक्षणम् ॥ ५३ ॥**

निश्चयें ज्ञानलक्षण ऐसें । मी देह स्वप्नींही नुमसे । तोचि महात्मा न्यासी असे । काषायवासें नव्हेचि ॥ १२ ॥ आत्म्यासी नाहीं आत्मस्मरण । तरी कैंचें प्रातःस्मरण । स्नानसंध्यादि सदाचरण । कोठें भिन्न नामक्रिया॥३५॥

सदाचारमिमं नित्यं येऽनुसंदधते बुधाः ।
संसारसागराच्छीघ्रं मुच्यंते नात्र संशयः ॥ ५४ ॥

ऐशिया सदाचरणासी । जे ज्ञाते धरितील मानसीं । ते शीघ्र सुटती निःसंशयेसीं । संसारसिंधूपासूनी ॥ अभ्यासीं होय प्रवृत्ती । चढती क्षणक्षणां प्रीती । तेणें कर्मांची समाप्ती । करोनि हेंचि आदरावें ॥ ४९ ॥

ऐसें न होतां ऐकोनी ।
कर्म त्यागील जो कोणी ।
शपथ असे तया लागूनी ।
ब्राह्मण्याची ॥ २०५० ॥





# प्रकरण २३ वें.

## शिव आणि सेवा.

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः।
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥
तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर।
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥
गीता अ. ३

[हे अर्जुना, याप्रमाणें सुरूं केलेल्या चक्राला अनुसरून जो इहंलोकीं वागत नाहीं व इंद्रियांमध्यें रममाण होतो, त्याचें आयुष्य पापमय होय. तो व्यर्थ जगतो. म्हणून सर्वदा असक्त होऊन कर्तव्य असें कर्म करीत जा. असक्त होत्साता कर्म आचरण करणारा पुरुष मोक्षपद मिळवितो.]

मागील प्रकरणांत जो ज्ञानयोग सांगितला आहे, तो जसा अत्यंत महत्त्वाचा आहे, त्याचप्रमाणें त्या प्रकरणाचें अखेरचें वचनहि एके अर्थी फार महत्त्वाचें आहे. अनधिकारी पुरुष अवेळीं कर्मत्याग करील तर त्यास ब्राह्मण्याची शपथ घातली आहे. कर्म—उपासना—ज्ञान अशी परमार्थाची सोपानपरंपरा आहे. अधिक विचार करूं लागल्यास हे त्रिप्रकार कर्म, उपासना आणि ज्ञान या प्रत्येकांतसुद्धां

आढळतील. म्हणजे कर्ममार्गांतहि, कर्म, उपासना, आणि ज्ञान अशी सोपानपरंपरा लागेल. त्याचप्रमाणें उपासनेंत, आणि ज्ञानांतही असें त्रित्व आढळून येईल. भक्तिमार्गाचीहि हीच मौज आहे. नवविधाभक्ति ही एक सोपानपरंपरा दिसते. या प्रत्येक भक्तिप्रकारांत कर्म–उपासना–ज्ञान हें त्रित्व कल्पितां येतें. नवविधाभक्तीचे प्रकार आहेत, त्यांचा निरनिराळ्या तऱ्हेनें व दृष्टीनें विचार करितां येतो. उदाहरणार्थ, श्रवण, कीर्तन आणि स्मरण या त्रिविध भक्तींत ध्येय निश्चित होतें. पादसेवन, अर्चन, वंदन यांत ध्येयधारणा सिद्ध होते. दास्य–सख्य–आत्मनिवेदन यांत ध्येय–धाता, जीव–ईश्वर, जीवात्मा–परमात्मा यांचा संबंध स्पष्ट होतो. देहबुद्धीनें ध्येयाचें दास्य म्हणजे सेवा करावी, जीवबुद्धीनें ध्येयाशीं या सेवेंत सख्यत्त्व म्हणजे तादात्म्य पावावें, आत्मबुद्धीनें देहबुद्धीचें, व अंश-अंशी भावाचें म्हणजे जीवबुद्धीचें, निःशेष आत्मार्पण करून, आत्मनिवेदनानें ब्रह्मीभूत व्हावें अथवा असावें, असा अनुक्रम लागतो. पण हे जे भक्तीचे नऊ प्रकार आहेत ते सूक्ष्मतेनें प्रत्येक भक्तिप्रकारांत अनुभवास येऊन नवविधभक्तीचें वर्तुळ प्रत्येक भक्तिप्रकारांत पुरें होणेंहि शक्य दिसतें. म्हणून श्रवणादि एकेका भक्तीनेंच आत्मनिवेदनापर्यंत कार्य होऊन परिक्षितीनारदादि उद्धरले असें शास्त्र सांगतें. अशीं हीं साधनमार्गांत वर्तुळांत वर्तुळें दिसतात. हा भक्तिमार्ग व्यावहारिक ध्येयास अनुलक्षून आचरतां येईल तर तो तसा नवयुगास पाहिजे आहे.

**न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः।**
**न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥**

मांडुक्य गौडपादीय कारिका २।३२

उत्पत्ति नाहीं. प्रलय नाहीं. कोणी बद्ध नाहीं. कोणी साधक नाहीं. कोणी मुमुक्षु नाहीं. कोणी मुक्त नाहीं. अशी ही परमार्थता आहे.

पण ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणीं वस्तुस्थिति अशी असली, तरी जग ज्याचा अनुभव घेत आहे ती स्थिति ती नव्हे. वरील परमार्थतेंत विचाराला व क्रियेला अवसरच नाहीं. पण जगाच्या सामान्य अपरमार्थस्थितींत मानवी जीवनरहस्याचा जो चक्रव्यूह आहे तो फारच व्यामोह उत्पन्न करणारा आहे. या व्यूहांतून फिरत असतां आपण ध्येयाचे अगदीं जवळ तर कधीं दूर अशी स्थिति होते. व मार्ग कोणता तो सांपडत नाहीं. जडवादापासून अजातवादापर्यंत हा मार्ग चढत गेला आहे. सामान्य प्रापंचिकापासून तों, अज्ञेय नसले तरी अज्ञात असलेल्या शिवगुरूंपर्यंत या विश्वस्वरूप मंगळसूत्राचे किती व कसे फेरे वरवर चढत गेले असावेत, हा विचार मननीय आहे. तृणजलुकेचे मंद चालीपासून तों विहंगमदृष्टीच्या झडपेपर्यंत प्रगतीच्या गतींत जो तरतमभाव दिसतो, तोहि लक्षांत घेण्यासारखा आहे. जेथें एकमेवाद्वितीयम्, शुद्धबुद्धमुक्तस्वभाववान्, अस्तिभातिप्रियरूप, इत्यादि वर्णनहि व्यर्थच ठरतें, अशा त्या परब्रह्माचें प्रकृति–पुरुष, माया–महेश्वर हें द्वैत झालें, व तेथून अनंतकोटि ब्रह्मांडांचा प्रपंच वाढतच आला, तेथपर्यंत या विश्वरचनेंत कांहीं व्यवस्था असेल काय ? किंवा रज्जूसर्पाच्या अथवा मृगजळाच्या, लहरींच्या मीमांसेप्रमाणें साराच भ्रम आहे ? हा विचार अंतःकरण गुंग करणारा आहे. या पिंडरचनेंत प्रत्येक इंद्रियाची अधिष्ठात्री देवता असते. त्या देवतेच्या सत्तेनेंच इंद्रियें कार्यक्षम होतात. ही पिंडांतील रचना ब्रह्मांडांत असेल तर तेथेंहि अनेक अधिकृत कर्मदेव असले पाहिजेत हें उघड आहे. वेदान्ती पुरुष आपल्याचसारख्या देहधारी संतांस साक्षात् परब्रह्मस्वरूप मानून मधल्या कर्मदेवांच्या सर्वच पाह्यऱ्या गाळतो. परंतु परब्रह्मस्वरूप सद्गुरु आणि सामान्य प्रापंचिक हे बाह्य व्यवहारांत देहदृष्टीनें दिस-

व्रात तितके साधनदृष्टीनें जवळ नसावेत असें वाटतें. मनुष्य-मात्रांच्या योगक्षेमाकडे पाहणारे व त्यांस हळूहळू परमार्थमार्गाकडे आणणारे असे ईश्वराचे अनेक मार्गदर्शकांचे मध्यंतरीं असावेत. हे शिवसेवक कधीं गुप्त तर कधीं उघड; अथवा कोणी गुप्त तर कोणी उघड असा प्रकार दिसतो. त्यांना जगन्मिथ्यात्व पटलें असलें तरी ते व्यवहारिकांना व्यावहारिक मार्गानेंच हळूहळू ज्ञानोपदेश देतात.

राजा हा ज्याप्रमाणें विष्णूचा अंश मानतात,त्याप्रमाणें गुरु हा शंकराचा अंश म्हणणें गैर होणार नाहीं.सर्व संप्रदायांचे आद्यगुरु आदिनाथ शंकर हेच असावेत असें दिसतें. नाथपंथाचे आद्यगुरु आदिनाथ शंकर हेच होत. श्री.काका महाराजांचा नाथपंथच दिसतो.त्यांचा उपासना-ग्रंथ अध्यात्मरामायण हा भगवान शंकरांनीं पार्वतीला सांगितलेला आहे. श्रीसमर्थ रामदासांचा एक आवडता ग्रंथ शिवगीता हाहि शंकरानींच केलेला उपदेश आहे. ज्ञानेश्वरादि संतांचे आद्यगुरु शंकरच होत. दत्तसंप्रदाय आणि नाथसंप्रदाय श्रीगोरखनाथाचे वेळीं एकरूप पावले कीं काय तें समजत नाहीं. रोगादि संकटनिरसनार्थ श्रीदत्तगुरूंची उपासना सरसहा सर्वांस सांगावी, असें काकांनीं तात्यांस एका पत्रांत कळविलें होतें. गुरुचरित्र किंवा शिवलीलामृत हे ग्रंथ कोणाहि ब्राह्मणानें संकटनिरसनार्थ वाचावे, असें काकांचें म्हणणें दिसतें. एकनाथ व समर्थ रामदास या उभयतांस श्रीदत्तगुरूंचा साक्षात्कार व उपदेश झालेला आहे. दत्तगुरूंची परंपरा आदिनाथापासूनच लागते. श्रीमत् शंकराचार्य यांचेहि आद्यगुरू श्रीशिवगुरूच होत.

या आदिनाथांपासून म्हणजे श्रीशिवगुरूंपासून ज्या अनेक संप्रदायपरंपरा निर्माण झाल्या त्यांत मच्छेंद्रनाथ–गोरखनाथ, गौडपादाचार्य–शंकराचार्य, निवृत्तिनाथ–ज्ञानेश्वर, जनार्दनपंत–एकनाथ; इत्यादि जोड्यांत कर्तृत्वाचे पसाऱ्यांत गुरूपेक्षां शिष्य सवाई

असा प्रकार दिसतो. रामतीर्थ व विवेकानंद ही सच्छिष्यांची जोडी अशीच आहे. ज्याप्रमाणें पोट भरण्याचें साक्षात् साधन अन्न हेंच आहे, पण तें अन्न द्रव्यावांचून मिळत नाहीं. त्याप्रमाणें गुरूंचें गुप्त विद्याधन व सच्छिष्यांचें ज्ञानाचें उघड सहस्रभोजन अथवा रामाची कृपादृष्टि, समर्थांची मेघवृष्टि व शिवछत्रपतींची स्वराज्यसृष्टि अशी परंपरा लागते. गोरखनाथ, शंकराचार्य, ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, यांनीं भरतखंडांत जें प्रचंड धर्मकार्य केलें त्यास दुसरी तोड नाहीं. पण या सर्वांचे गुरु व त्यांचे आद्यगुरु श्रीशंकर म्हणजे वैराग्याची सीमा होय. तथापि त्यांचीच इच्छा अथवा ईश्वराची इच्छा वरील महापुरुषांचे द्वारां ज्ञान, उपासना आणि कर्म असें अवतरण पावून प्रत्यक्ष लौकिकव्यवहारांत लोकसंग्रहकारी झाली, असेंच म्हणावें लागतें.

श्रीदत्तगुरु, श्रीहनुमान् अशा विभूति चिरंजीव आहेत. महारुद्रहनुमान हें शिवाचेंच रूप होय. व समर्थ रामदास हे हनुमान होत असें मानतात. तसेंच श्री. काका पुराणिक हे वृद्ध रामदूत हनुमान होत, असें अनेक साक्षात्कारी थोर साधु पुरुषांचें म्हणणें असे. हे गुप्त वेषांत सर्वत्र संचार करणारे श्रीदत्तगुरु, श्रीहनुमान, इत्यादि देव या अवाढव्य ब्रह्मांडांत निरनिराळया रूपांत धर्मकार्य करीत आहेत असें दिसतें. महाराष्ट्रांत दत्तसंप्रदाय मोठा आहे. त्याचप्रमाणें हनुमंताचें मंदिर नाहीं. असें लहानसें खेडेंहि नाहीं. शिवोपासनाच श्रीमारुतिउपासनेचे रूपानें सर्वत्र पसरली आहे. बहुतेक गांवांतून एखादें शिवमंदिर असतेंच. एकनाथ रामदासादि उपासक संत हे ईश्वराचे पाईक होत. ईशकार्य करणें, हाच त्यांचा जीवनहेतु होय.

श्रीएकनाथ व श्री. काका पुराणिक यांचें कित्येक मुद्यांत साम्य दिसतें. गृहस्थाश्रमी संतांत एकनाथ हे एक आदर्शभूत होते.

श्री. काकांना एकनाथांचें स्वास्थ्य लाभलें नाहीं; पण त्यांचा गृहस्थाश्रम नाथांप्रमाणेंच आदर्शभूत होता. नाथांप्रमाणेंच काकांची शांति, समताबुद्धि, निरहंकारी साधेपणा विलक्षण असे. एकनाथांचे घरीं जसें लोकांस रोज श्रवण घडे, तसेंच काकांचें व्रत होतें. पण एकनाथांनीं प्रचंड वाङ्मयद्वारा जें लोकशिक्षणाचें अवाढव्य कार्य केलें तसें करण्याचा अभिनिवेश काकांचे अत्यंत अमानित्वामुळें त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न होणें अशक्यच होतें. अथवा त्यांचें अवतारकार्य तशाप्रकारचें नव्हतें, म्हणूनच मागील प्रकरणांत श्रीसद्गुरु समर्थ काका महाराज पुराणिक यांची व बंगालचे श्री. रामकृष्ण परमहंस यांची थोडक्यांत तुलना केली आहे. आतां या प्रकरणांत श्री कालीचे एक साधे पुजारी श्री रामकृष्ण परमहंस यांचे पट्टशिष्य स्वामी विवेकानंद यांनीं गुर्वाज्ञापालनांत शिव आणि सेवा या व्रताचा जसा विस्तार केला, त्याप्रमाणें श्रीधीपेश्वराचे एक साधे पुराणिक श्री काकामहाराज यांचे शिष्य तात्यासाहेब पुराणिक यांनीं लौकिकव्यवहारांत श्रीधूतपापेश्वर–सेवेचा विस्तार कसा आरंभिला तें पहावयाचें आहे.

श्रीरामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद हे अलौकिक गुरुशिष्य खरे, पण त्यांच्या आचारविचारांत ठळक भेद दिसतात. श्री रामकृष्ण सत्त्वगुणी तर विवेकानंद रजोगुणी असा मुख्य फरक दिसतो. तोच प्रकार श्रीकाका पुराणिक आणि तात्या पुराणिक यांचेमध्यें दिसून येतो. शिव आणि सेवा हें श्रीरामकृष्णांचें ब्रीद वाक्य नव्हे. निदान त्यांचे अनुयायी ज्या अर्थानें या वाक्याचा उपयोग करीत, त्या अर्थानें तरी तें रामकृष्णांचें ब्रीद वाक्य नव्हतें. श्री रामकृष्णांच्या ठिकाणीं कोणताच कर्तव्यशेष राहिला नव्हता. फार तर कांहीं सच्छिष्यांना परमार्थमार्गाला लावावें, इतकीच त्यांची इतिकर्तव्यता होती. आणि कोणाही संतांचें कार्य इतकेंच असतें.

रुपयांची गंगाजळी होईपर्यंत मनांतील हेतु पुरे करतां येत नाहींत. यास्तव ते लाख रुपये कसे मिळवावे, हा तर त्यांच्यापुढें एक जबरदस्त प्रश्न होताच. पण तो प्रश्न सुटण्याचे अगोदरच दुसऱ्या अनेक अडचणींनीं व आपत्तींनीं त्यांस गांठलें. त्यांतच प्लेगची सांथ ही एक महाआपात्ति होती. या आपत्तींत तात्यांच्या सेवावृत्तीनें विशेष उचल खाल्ली. ते त्यावेळीं व्यक्तिशः अतिशय विवंचनेंत व अडचणींत होते. पण तशाहि स्थितींत आपणांस यावेळीं जास्तींत जास्त लोकांस कसें उपयोगी पडतां येईल, हें मनांत आणून त्यांनीं प्लेग, कॉलरा या सांथींच्या रोगांवरील औषधियोजनांचीं हजारों हस्तपत्रकें वांटलीं व त्याबरोबर शेंकडों रुपयांची औषधेंहि फुकट देण्याकरितां गांवोगांव पाठविलीं. पण औषधयोजनेंत ज्यांना सहस्रपुटि अभ्रक अथवा मौक्तिकभस्म अशीं मौल्यवान औषधें घेण्याचें सामर्थ्य नाहीं, त्यांचीही कारखान्यानें कशी सेवा करावी, इकडे तात्यांचें फार बारकाईनें लक्ष लागलें. रोगी ग्राहक कितीहि गरिब असो, त्याला कारखान्यानें औषधें नाहींत असें म्हणतां कामा नये, हा त्यांचा बाणा असे. सेवेच्या दृष्टीनें कारखान्याला श्रीमंत व गरिब सारखेच. धंद्याचे दृष्टीनें मात्र त्यांत भेद असावा; तो असा कीं, श्रीमंताकडे मौक्तिक भस्म पाठवावें, तर गरिबाला शौक्तिक भस्म द्यावें, असें त्यांचें धोरण असे. पैसे तर त्यानां पाहिजेच होते. पण पैशापेक्षांहि आपल्या कारखान्याचा उपयोग देशांतील कोनाकोपऱ्यांतील गरिबांना सुद्धां कसा होईल, इकडे त्यांचें लक्ष असे. एकाच रोगावर मौल्यवान व सवंग अशीं उभयविध औषधें ते तयार ठेवीत. त्यांना पैसे स्वतः श्रीमंत होण्याकरितां नको होते. कारखान्यांतून प्रापंचिक खर्चासाठीं ते अल्प प्रमाणांत उचल करीत. कारखाना लोकसेवेस अधिकाधिक समर्थ व्हावा व कारखान्याचें धर्मराज्य बनावें अशी

त्यांची विलक्षण महत्त्वाकांक्षा होती. अमेरिकेच्या जस्टिस लिंडसे-प्रमाणें तात्यांकडे दुर्वृत्त तरुणांचा पत्रव्यवहार फारच असे. दुर्वृत्त तरुणांना आपल्या रोगाची हकीकत गांवच्या अगर परगांवच्या वैद्यास अगर डॉक्टरास प्रत्यक्ष सांगणें अत्यंत लज्जास्पद वाटतें. यामुळें पत्रव्यवहारानें हकीकत कळवून औषधयोजना करून घेणें, त्यांस सोयीचें होतें, हें तर खरेंच. पण त्याजबरोबर तात्यांच्या पत्रव्यवहारांत अशी कांहीं कळकळ व अगत्य दिसे कीं, त्या पत्रांतील अगत्यानेंच रोगी अर्धा अधिक हुषार होई. अत्यंत निंद्य वर्तनाच्या, व्यभिचारी व आत्मघातकी वाईट संवयी लागलेल्या, रोग्यांससुद्धां त्यांनीं कधीं त्यांच्या मनाला बोंचेल असें तिरस्कारानें लिहिलें नाहीं. इतकेंच नव्हे तर अशा रोग्यांच्या पत्रांना उत्तरें पाठविण्यांत त्यांनीं कधींच दुर्लक्ष व दिरंगाई केली नाहीं. अशा घसरलेल्या रोग्यांच्या शारीरिक स्थिती-प्रमाणें त्यांची मानसिक स्थितिहि अत्यंत शोचनीय झालेली असते. तोंड दाबून बुक्यांचा मार व्हावा अशी त्यांची दुर्दशा होते. आपलें दुखणें कोणाला न कळूं देतां तें त्यांना सहन करावें लागतें. अशा पश्चात्तापानें पोळलेल्या व असहाय झालेल्या तरुण रोग्याच्या मनाला तात्यांचें आरोग्यासंबंधीं आश्वासनपर पत्र अमृताप्रमाणें नवजीवन प्राप्त करून देई. लोकसेवेंतील तात्यांची ही उदार समदृष्टिच त्यांच्या यशाला पुष्कळ अंशानें कारणीभूत झाली असावी. पंकांत रुतलेल्या कमलिनींना आपल्यावर प्रेम करणारा दूरवर आकाशांत प्रभाकर आहे, असें वाटून आनंद वाटावा; त्याप्रमाणें, लांबच्या एकीकडच्या पत्नेलींतून अत्यंत सहानुभूतीचीं व कळकळीचीं पत्रें आलेलीं पाहून रोगांत खिचपत पडलेल्या अभाग्यांस भाग्य उदयास आल्या-सारखें होई.

सन १९०० चे एप्रिलांत तात्या कोकणांत गेल्यावेळीं त्यांनीं घरीं कारखान्याच्या व्यवस्थेबद्दल पत्रें पाठविलीं, त्यांत एका पत्रांत ते लिहितात कीं, "चि. गदाधर रावजी यांनीं डांकेच्या वेळीं केबीनमध्यें [ पत्रव्यवहाराची चार खांबावरील कचेरी ] बसावें व उत्तरें होतील तितकीं द्यावीं. मुदतीवर टाकलीं तरी चालतील. गोड शब्दांनीं उत्तर लिहावें. कायदेशीर नसावें."

तात्यांच्या कारखान्याच्या धंद्यांतील पत्रव्यवहार ही कला त्यांना विशेष साध्य झाली होती. त्यांनीं आपल्या पत्रव्यवहारानें लोकांना आकर्षित केलें. त्यांच्या मनांत कारखान्यासंबंधीं प्रेम व अगत्य उत्पन्न केलें. अशा रीतीनें एकेक ग्राहकानें कारखान्यास आणखी पांचदहा ग्राहक मिळवून दिले. यामुळें जाहिरातींचा पाऊस हें जें नवयुगांतील प्रसिद्धीचें मुख्य साधन, त्याचा अवलंब न करितां कारखान्याची प्रसिद्धि व वाढ एकसारखी होत गेली. सन १९०७ सालापर्यंत कारखान्यांतील विक्रीच्या औषधांची यादी चारशेंवर गेली. याशिवाय सुमारें शंभर प्रकारच्या काढ्यांचीहि त्यांत नवीन भर पडली. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत विशेषें-करून बृहन्महाराष्ट्रांत सुमारें शंभर एजन्सी कारखान्यांतील औषधें विकूं लागल्या. हें सर्व तात्यांच्या सेवाव्रताचेंच फळ होय.

जगद्विख्यात फोर्ड मोटार कंपनीचे संस्थापक हेनरी फोर्ड यांनीं आपल्या आत्मचरित्रांत आपण आपल्या धंद्यांत कशामुळें यशस्वी झालों, त्याचें फार सुंदर व उद्बोधक विवेचन केलें आहे. त्यांत त्यांनीं इतर धंदेवाईकांस मार्गदर्शक होण्यासाठीं कांहीं फार महत्त्वाच्या अशा अनुभविक सूचना दिल्या आहेत, त्यांतील सारांश असा—

( १ ) भविष्य कालासंबंधीं भीति सोडावी. अपयश हा सुधारणेचा

पाया होय. भूतकालीन परंपरेचा पुढील प्रगतीचे मार्ग आंखण्यांत अगत्यानें उपयोग करावा.

( २ ) धंद्यांत कोणाशीं चुरस करूं नये व कोणाच्या चुरशीची पर्वा करूं नये. चुरशीनें दुसऱ्याचें नुकसान न करितां आपण आपल्या अक्कलहुषारीनें आपण तयार केलेला माल जास्त उपयुक्त व निर्दोष करावा. चुरशींत दुसऱ्याचें नुकसान चिंतणें हें पाप होय.

( ३ ) लोकसेवा हेंच धंद्याचें ध्येय असावें.नफ्याचे दृष्टीवर धंदा न चालवितां सेवेचे दृष्टीनें चालवावा. नफ्याची दृष्टि हा लोकसेवेचा हेतु न धरतां लोकसेवेची फलश्रुति नफ्यांत होऊं द्यावी.

( ४ ) हलक्या किंमतीचा कच्चा माल घेऊन भारी किंमतीला त्याचा तयार माल. विकणें, हें धंद्याचें योग्य स्वरूप नव्हे. योग्य किंमतीचा कच्चा माल घेऊन त्यावर शक्य तितक्या थोड्या फरकानें तयार माल विकणें व त्याचा सर्वत्र प्रसार करणें, हें धंद्याचें योग्य स्वरूप होय.

ज्या यशस्वी धंद्यांतील अनुभवांचें मंथन करून फोर्ड साहेबांनीं वरील विचाररत्नें काढलीं, त्या त्यांच्या धंद्याला ज्यावेळीं आरंभहि झाला नव्हता, त्यापूर्वींच हीं तत्त्वें तात्यांच्या डोक्यांत खेळत होतीं, असें दिसतें. प्रतिकूल कालांतही त्यांचें साहस वाखाणण्यासारखें होतें. जाहिरातींच्या साधनानें त्यांनीं कोणाहि धंदेवाईकांशीं चुरस केली नाहीं. हेनरी फोर्ड यांच्या लोकसेवेच्या भावनेपेक्षांहि तात्यांची श्रीधूतपापेश्वरसेवेची भावना अधिक धर्मपर, निःस्वार्थी, व पवित्र होती. त्याचप्रमाणें कच्चा माल योग्य ठिकाणांहून मागवून माफक दरानें औषधें विकण्याचा त्यांचा प्रयत्न असे. तो इतका कीं, त्यांच्या माफक दरामुळेंच त्यांचा सूतशेखर आणि हेमगर्भ हे शास्त्रोक्त

नाहींत, त्यांत सोन्याचे कण मुळींच नाहींत, यामुळें त्यांना स्वस्तांत औषधें विकतां येतात, इत्यादि गैरसमज कांहीं काल लोकांत रूढ असत. पण पुढें लोकांस लवकरच कळून आलें कीं, कारखान्यांतील मात्रांत मधून मधून सोन्याचे कण दिसत नाहींत, याचें कारण त्यांत सोनेंच नसतें हें नसून, औषधांचा खल उत्तम झाल्यामुळें त्यांत तसे दिखाऊ ठळक कण नेहमींच सारखे दिसणें शक्यच नाहीं.

श्रीसद्गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें तात्या भाविकपणें अध्यात्म-रामायणपाठ वगैरे उपासनाकर्म नित्य करीतच होते. पण त्यांची खरी आवडीची उपासना वेगळीच होती. त्याचें थोडक्यांत दिग्दर्शन वर केलें आहे. या त्यांच्या उपासनेंतील विकल्पानें त्यांचा मोक्ष थोडा दुरावला असला, तरी त्यांनीं आपल्या धंद्याला श्रीधूतपापेश्वर-सेवेचें व त्याचबरोबर जनतासेवेचें जें रूप दिलें, त्यामुळें त्यांच्या धंद्याचें यश व पावित्र्य वाढलें, व रसक्रियेंत होणाऱ्या अनैच्छिक हिंसादि दोषांचेंहि परिमार्जन झालें असेल, यांत शंका नाहीं.

तथापि श्रीधूतपापेश्वरसेवा व श्रीधूतपापेश्वर कारखान्याची सेवा यांत अंतर आहे, ही गोष्ट श्रीसद्गुरूंनीं त्यांस जाणविली होती, तेंहि ते विसरले नाहींत. त्यांच्या मनाचीहि शिवभक्तीकडे ओढ होतीच. धोपेश्वरीं ते दरसाल दर्शनाला जात. तेथें गेल्यावर बहुधा महारुद्राभिषेक होईच. या धोपेश्वरच्या यात्रांनीं त्यांच्या मनाला समाधान वाटे. काशीविश्वेश्वराच्या यात्रेनंतर पूर्ण समाधान प्राप्त होईल असेंहि त्यांच्या मनानें घेतलें होतें. शिवाय काशीयात्रा करून पितृऋण फेडावें. ही पण कर्तव्याची बोचणी त्यांच्या मनावर होतीच.

सन १९०५।६ सालीं तात्यांना काशीयात्रेचा एकसारखा ध्यास लागला होता. अखेर श्रीगुरुकृपेनें त्यांची काशीयात्रा यथास्थित

रीतीनें घडूनहि आली. ती हकीकत पुढील प्रकरणांत निवेदन करूं.

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥**

३।१७ गीता

[ जो मनुष्य आत्म्याचेच ठिकाणीं रत असतो, आत्म्याचे ठिकाणीं तृप्त असतो आणि आत्म्याचे ठिकाणीं संतुष्ट असतो त्याला कांहीं कार्य रहात नाहीं. ]





# प्रकरण २४ वें.

## काशीयात्रा.

**विश्वेशं माधवं धुंडीं दंडपाणिंच भैरवम् ।**
**वंदे काशीं गुहां गंगां भवनीं मणिकर्णिकाम् ॥ १ ॥**

तात्यांबरोबर जे काशीयात्रेस गेले होते, त्यांच्यापैकीं एका गृहस्थांकडूनच हें प्रकरण लिहून घ्यावयाचा मूळ संकल्प होता. पण त्यांच्याकडून वेळेवर कांहींच माहिती मिळाली नाहीं, यास्तव श्री. गोविंद हरि फडके यांच्या सुप्रसिद्ध यात्रावर्णन पुस्तकाच्या आधारें, जणूं काय आपण तात्यांबरोबर जात आहोंत असें समजून, आपण श्रीक्षेत्र काशी, काशीयात्रा व तत्संबंधीं आख्याइका यांच्याशीं अगोदर परिचय करून घेऊन नंतर तात्यांच्या यात्रेंतील विशेष पाहूं.

" काशीक्षेत्र* हें उत्तरवाहिनी भागिरथीच्या पश्चिम तीरावर फार प्राचीन काळापासून वसलें आहे. मोक्षदायिनी सहापुऱ्यांपैकीं ही एक असून श्रीविष्णूच्या नासिकास्थानीं आहे. या क्षेत्राची मर्यादा

*टीपः—रा. गोविंद हरि फडके यांच्या व इतर पुस्तकांच्या आधारें हें प्रकरण स्वतंत्रपणें लिहिण्यासहि वेळ न राहिल्यामुळें येथें त्यांच्या पुस्तकांतील उतारा घेऊन तें काम भागवीत आहें. रा. गोविंद हरि फडके यांचा हा लेख संक्षिप्त असून मार्मिक आहे. ह्याचा मीं आयताच उपयोग करीत आहें. याबद्दल मी सदर ग्रंथकारांचा फार आभारी आहें.

भागीरथीला अशी व वरुणा ज्या ठिकाणीं मिळतात त्यांच्या मधल्या भागांत आहे. म्हणजे यांत सुमारें तीन मैल लांबीचा गंगेचा कांठ येतो. भरतखंडांतील सर्व क्षेत्रांमध्यें हें क्षेत्र आदिस्थान असून विश्वेचें विलासमंदिर, सत्पुरुषांचें निवासस्थान आणि प्राचीन नानाविध ज्ञानांचें भांडार अशी या पुण्यक्षेत्राची पूर्वींपासून ख्याति आहे. यामुळें पंडित मदनमोहन मालवीय ह्यांनींहि हल्लीं याच ठिकाणीं हिंदु युनिव्हर्सिटी स्थापून जुन्या ज्ञानांत नव्या ज्ञानाची भर घालण्याचा प्रयत्न केला आहे. या क्षेत्राचें पूर्वकालीन नांव वाराणशी असें होतें. सुमारें हजार वर्षीपूर्वीं बनार नांवाच्या राजानें हें शहर बांधिलें, म्हणून तेव्हांपासून याला बनारस म्हणतात. किंवा बनारस म्हणजे सर्व रस एकत्र करून तयार केलेली नगरी अशी हिची व्याख्या करतात. महासाधू कबीर याचा जन्म व मृत्यु हीं काशींतच झालीं. सृष्टीच्या उदयकालीं निर्गुण ब्रह्मापासून सगुणब्रह्म, प्रकृति इत्यादि अंगें एकापासून प्रगट होऊन सर्व जग उत्पन्न झालें त्यांपैकीं मूळ प्रकृति प्रथम त्या ठिकाणीं प्रगट झाली व या क्षेत्रास काशी हें नांव मिळालें. सारांश, अतिप्राचीन कालापासून किंबहुना सृष्टीच्या उदयापासून याची प्रसिद्धी आहे. येथील मुख्य तीर्थ चक्रपुष्करणी ही विष्णूंनीं आपलें चक्र मारून तपश्चर्येनें उत्पन्न केली. तें पाहून आनंदानें श्रीशंकरांनीं येथें तांडव केलें. नाचतां नाचतां त्यांचे कानांतील मणी त्यांत पडला. म्हणून त्यास मणकर्णिका म्हणूं लागले. नंतर मागाहून गंगा आली. म्हणजे गंगेच्या पूर्वींची काशी आहे. भगवान बुद्धानें येथेंच आपल्या धर्माचा प्रसार केला. पुढें श्रीशंकराचार्यांनीं त्यांचा वादांत पराभव करून येथेंच आपलें अद्वैतमत स्थापन केलें. नंतर मुसलमानांपासून या शहरास फार त्रास झाला. तरी आर्यधर्माचें पूज्यस्थान हें अद्यापही आहे. पुराणकालानंतरहि हिंदुस्थानांतील देशो-

देशींचे अनेक राजेरजवाडे व श्रीमान् लोक काशिक्षेत्रीं येऊन त्यांनीं अगणित द्रव्य खर्चून आपलें नांव यावच्चंद्रदिवाकरौ राहावें म्हणून बांधलेलीं देवालयें, घाट, राजमंदिरें, अन्नछत्रें, विद्यापीठें इत्यादि धर्म-कारणांनीं ह्या नगरास विशेष महत्त्व आलेलें आहे. काशींत अन्नछत्रें सुमारें चारशें आहेत ! रोज जरी निरनिराळ्या अन्नसत्रांत गेलें तरी वर्षभर सुद्धां त्या सत्रांत पुन्हां येण्याची जरूर पडणार नाहीं ! दिवसानुदिवस अशी महागाई होत असतां अन्नसत्रें चालविणें फार जोखमीचें आहे. तरी जे चालवितात ते धन्य आहेत ! हें व्रत चाल-विण्याचें मुख्य कारण 'नान्नोदकसमं दानं' अन्नासारखें दान नाहीं. शिवाय आजपर्यंत पूर्वजांनीं जें व्रत चालविलें तें न चालविणें हें नामर्दपणाचें आहे. पण हल्लीं ते आपल्या इभ्रतीकरितां तें चालवितात. एवढेंच."

"काशींत मोठमोठे वेदशास्त्र जाणणारे चारी वेदांचे पंडित आहेत. येथें राहून ज्यांनीं सांगविद्याभ्यास केला त्यांची भरत खंडांत सर्वत्र मोठी धन्यता असते. व त्या ठिकाणचा शास्त्रनिर्णय आसेतुहिमालय शिरसावंद्य मानला जातो. या क्षेत्रांत इतकीं देवालयें आहेत कीं, दोन मण तांदूळ घेऊन प्रत्येकास चार चार दाणे ठेविले तरी पुरे होणार नाहींत. यामुळें या शहरास पाश्चात्य लोक 'सिटी ऑफ टेंपल्स' म्हणजे मंदिर नगरी असें. म्हणतात. काशीस कांहीं तरी कृत्य करून ठेविल्यास तें जग प्रख्यात होतें. कारण या ठिकाणीं सर्व जगांतून मनुष्य येतो व तें त्याच्या दृष्टीस पडतें. म्हणून कोणीं देवळें, घाट, धर्मशाळा, अन्नसत्रें वगैरे आपल्या ऐपतीप्रमाणें कामें करितो. हिंदु मुसलमानांच्या धर्मयुद्धांत व नंतर त्यांच्या धार्मिक छळांत त्यांनीं येथील बहुतेक देवळें भ्रष्ट केलीं आहेत. खुद्द विश्वेश्वराच्या मूळस्थानावरच मुसलमानांनीं मशीद बांधली आहे ! हें

जुन्या मोठ्या नंदीवरून स्पष्ट होत आहे. त्या नंदीचें तोंड अगदीं मशिदीकडे आहे! मुसलमानांस वाटलें कीं, हीं देवळें बाटविलीं म्हणजे हिंदुधर्म नाहींसा होईल! हिंदुधर्माचा नाश करण्याकरितां औरंगजेबानें आमरणांत खटपट केली. त्याला वाटे देवळें मोडूं, का मूर्ति फोडूं, का विहिरी बाटवूं, का मशिदी बांधूं, का बाटविण्याकरितां इनामें देऊं, काय करूं तरी काय, म्हणजे हिंदुधर्म नाहींसा होईल! हिंदुधर्माचें रहस्य प्रत्येक हिंदूच्या हृदयांत आहे. तें देवळांत, मूर्तींत किंवा तीर्थांत नाहीं. मंत्र म्हटला कीं वाटेल तेथें देव, तीर्थ हजर होतें! हें त्या बिचाऱ्याला कळलें नाहीं आणि शेवटीं निराश होऊन मरून गेला. पण हिंदु धर्म जशाचा तसाच राहिला! * काशीची योग्यता तिळमात्रही कमी झाली नाहीं. मुसलमानी कारकीर्दीनंतर जेव्हां स्वस्थता झाली. स्वराज्याचा झेंडा जिकडे तिकडे फडकूं लागला, तेव्हां सर्व देवतांची पुन्हां स्थापना झाली! देवतांची स्थापना मंत्रांनीं होते, मंत्र ब्राह्मणांच्या स्वाधीन आहेत, आणि ब्राह्मण मूळापासून निर्धनच असावयाचे! अर्थात् त्यांचेकडे कोणी लक्ष देत नाहींत. कारण सर्वांचा हल्ला संपत्तीवर आहे! तसेंच सर्व शुद्धता गंगोदक, गोमूत्र व मंत्र यांनीं होते व यांचा नाश तर कधीं कोणास करवणार नाहीं. तसेंच हिंदु धर्माचें तत्त्वज्ञान निरंतर श्रेष्ठच राहणार. या हिंदु धर्माच्या चिवटपणामुळें हा हिंदु धर्म यावच्चंद्रदिवाकरौ अभंग राहील, असें पाश्चात्यांसही आतां वाटूं लागलें आहे. लोकमान्य टिळक यांच्या खटल्यामुळें महाराष्ट्रांत प्रसिद्धीस आलेले सर व्हॅलंटैन चिरोल यांचे

*[ टीपः—औरंगजेबाचा व काशीचा ऋणानुबंध वर वर्णिला आहे, पण काशीच्या महाराष्ट्रीय उपाध्यायांस बौद्धमतानुयायी महाराज अनंगपाळ व मोंगल बादशहा अकबर व शहाअलम यांनीं सनदा दिल्या आहेत. सं. ]

लॉर्ड मेस्टन यांच्या अध्यक्षतेखालीं 'सोसायटी ऑफ आर्ट' च्या मार्फत व्याख्यान झालें. त्यांत ते कबूल करतात कीं, " हिंदु धर्माचा चिवटपणा कांहीं अवर्णनीय आहे! तो बुद्धाच्या शांत चेहऱ्याला किंवा त्याच्या दुर्भेद्य कोटिक्रमाला ज्याप्रमाणें भुलला नाहीं, त्याचप्रमाणें तो महंमदीयांच्या समशेरीलाही भ्याला नाहीं. इंग्रजांच्या पहिल्या अमदानींत आधिभौतिक सुधारणेच्या थाटामाटानें प्रथम हिंदुधर्म थोडासा घाबरला खरा; परंतु लवकरच सावध होऊन, त्यानें खिस्ती लोकांच्या भ्रमाचा भोपळा फोडून टाकला. खिस्ती धर्माला आतां हिंदुधर्मावर वर्चस्व मिळविण्याची मुळींच आशा उरली नाहीं. हिंदु लोकांची पद्धति, मानवी आयुष्यक्रमाचा त्यांनीं ठरविलेला मार्ग, हितपरिणामी वर्णव्यवस्था व अनेक शास्त्रीय कोटिक्रमाच्या सुसंगतीनें त्यांनीं शोधून काढलेलें दिव्य पारमार्थिक साध्य इत्यादि आर्य संस्कृतीचे सद्गुण फारच प्रशंसनीय व सर्वांत श्रेष्ठ आहेत. हिंदुधर्माचें द्वेषबुद्धीनें शक्य तितकें परिशीलन करून पाश्चात्यांनीं त्यांमधून काढलेलें हें गूढ तत्त्व आहे. अर्थात् याच्यावर विलायती शिक्का आहे. तेव्हां आमच्या सुधारकांनीं यापुढें तरी जुन्या चाली व आर्य संस्कृति यांना नांवें ठेवण्याचें सोडून दिलें पाहिजे."

" येथें काळभैरवाचें प्रसिद्ध देवालय आहे. काळभैरव हा शंकराचा मुख्य पराक्रमी दूत किंवा सेनापति आहे. या देवळाचा नाश करण्याकरितां मुसलमान शिरले असतां त्यांतून मोठमोठे भुंगे उत्पन्न होऊन त्यांनीं मुसलमानांस परतविलें! तेव्हां हें दैवत जागृत आहे असें वाटून त्यांनीं त्याचा नाश करण्याचें सोडून दिलें! म्हणून त्यास अद्याप धक्का लागला नाहीं. यामुळें काशीयात्रेंत त्याची महती मोठी आहे. काळभैरवाष्टक, त्याचे गंडे घेणें व त्याचे ब्राह्मण घालणें हा

येथील मुख्य यात्राविधि आहे, तसेंच सर्व यात्रा केल्यानंतर सर्व शाखेचे ब्राह्मण बोलावून त्यांचें वसंतपूजेप्रमाणें पूजन करून वेदघोष किंवा मंत्र-जागर करवावें व सर्व वेदांचा आशिर्वाद घ्यावा. अशा प्रकारचे तेजस्वी व चतुर्वेदाचे ब्राह्मण दुसरे कोठेंही मिळत नाहींत. कोणीं म्हणतात, सामवेद व अथर्ववेद नाहींसे झाले. परंतु हें म्हणणें खोटें आहे. येथें सर्व वेद जागृत आहेत. सबब त्यांचा हा वेदघोष अवश्य ऐकावा व हा आपल्या उपाध्यामार्फत सहज करितांहि येतो. येथें दर्शनें [ मथळ्यावरील श्लोकांत ] वर्णिल्याप्रमाणें करावीं लागतात. विश्वेश्वराजवळ पूर्वीं पाणी नव्हतें; म्हणून कृतयुगांत जटिलवान् नांवाच्या योग्यानें त्रिशूल मारून एक कूप निर्माण केला. त्यालाच ज्ञानसंपन्न होऊन ज्ञानपाणी [वापी] म्हणूं लागले. यांत स्नान केल्यानें मनुष्य शंकराच्या प्रसादानें मोक्षास जातो. ही विहीर बंद असते व येथें एक मनुष्य बसलेला असतो. तो पोहोऱ्यानें पाणी काढून लोकांना मार्जनास देतो. त्याबद्दल त्याला पैसा-दिडकी द्यावी लागते. स्नान केल्यास सव्वा रुपया द्यावा लागतो. काशीस वृद्ध कालकूपाचें पाणी क्षारयुक्त व चमत्कारिक आहे. पण तें सर्वरोगनाशक आहे, अशी त्यांची प्रसिद्धी आहे. काशीस दिवोदास ब्राह्मण आपल्या तपश्च-र्येनें विश्वेश्वरापेक्षां श्रेष्ठ झाला व त्यानें काशींतून विश्वेश्वरास सुद्धां घालविलें. तेव्हां श्रीविष्णूनीं तेथील लोकांस बौद्ध धर्माची दीक्षा देऊन धर्मभ्रष्ट केलें, तेव्हां दिवोदास पळाला व शंकर तेथें येऊन राहिले, अशी पौराणिककथा काशीखंडांत आहे. यांत गौतम बुद्धास श्रीविष्णूचा अवतार मानिलें आहे. व संकटसमयीं शंकरास काशींतून पळण्याची संवय दाखविली आहे ! हें मत गौण आहे. प्रयत्न केला असतां देव भक्तांना सुद्धां आपणापेक्षां श्रेष्ठत्व देतो, हे प्रसिद्धच आहे. ‘ ऐसा भक्त आवडे । मज जीवाचेनि पाडे ॥’ असें

ज्ञानेश्वरींत म्हटलेंच आहे. काशीचे पश्चिमेस कौदेवीचें अगदीं लहान देवालय आहे. पण हिचें दर्शन घेतल्याशिवाय यात्रा सफल होत नाहीं, असें उपाध्ये म्हणाले. तिला गंगेंतून होडीनें जावें लागतें. यामुळें गंगेतून जात असतां काशीच्या सर्व घाटांची[1], वरील इमारतींची व देवळांची अपूर्व शोभा पहावयास मिळते ! काशीस गंगा धनुराकार असून, ती गंगेच्या पश्चिमेस आहे. गंगेचा ओघ संथ आहे. यामुळें सूर्योदयीं गंगेची व तिच्या मागें तीन तीन चार चार मजली भव्य इमारतींची शोभा जिन्या सारखे उतरत आलेले स्नानघाट, व त्यावर असंख्य स्त्रीपुरुषांचा जमाव व त्यांची संध्यावंदनाची गडबड, ब्राह्मणांचा वेदघोष व गंगेंत बुड्या मारणारांचे 'जयगंगे,' 'जयमाताजी,' असे प्रेमध्वनि, गंगेची चाललेली पूजा व आरती व गंगेच्या विस्तीर्ण पात्रांतून इकडे तिकडे वेगानें जाणाऱ्या मनुष्यांनीं गजबजलेल्या अशा लहान मोठ्या नावा व या सर्वांवर बालसूर्याचे किरण पडले म्हणजे या सर्वांचा एक चमत्कृतिजनक देखावा पाहून मोठें कौतुक वाटतें. तें प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय समजणार नाहीं. गंगेवर बांधलेले असे लहानमोठे चव्ऱ्यांयशीं घाट आहेत. घाटाशिवाय रिकामी जागा अगदीं थोडी आहे व तीवरहि घाट बांधण्याची तजवीज होत आहे. हा सर्व प्रकार कौदेवीला जातांना दिसतो. म्हणून तिचें महात्म्य मोठें ठरविलें आहे. बाकी देऊळ अति लहान म्हणजे सुमारें छातीभर आहे. मूर्तिही विशेष सुंदर नाहीं. व तिला कवडींचं

---

१ **काशीचे घाटः**—प्रल्हादघाट, त्रिलोचन, गायघाट, लालघाट, शीतलाघाट, ब्रह्मघाट, दुर्गाघाट, बिंदुमाधवघाट, पेशवेघाट, जठारघाट, रामघाट, अग्नेश्वरघाट, भोसलाघाट, गंगामहाल, संकटाघाट, चक्रपुष्करणीघाट, स्मशानघाट, ललिताघाट मिऱ्याचा पुस्ता, मानमंदिरघाट, दशाश्वमेधघाट, अहल्यादेवीचाघाट, मुनशीघाट, राणामहालघाट, चौसष्टीघाट, पांडेघाट, राजघाट, नारदघाट, मानससरोवरघाट, क्षेमेश्वरघाट, केदारघाट, हनुमानघाट, शिवाळेघाट, तुलसीघाट. [ सं.]

वाहावयाची असा संप्रदाय आहे. म्हणून येथें कोणी उपाध्याही नसतो. एखादा पोर बसलेला असतो."

"मुसलमानांच्या धांगडधिंग्यानें विश्वेश्वराच्या देवळाचा नाश झालां, हें मागें सांगितलेंच आहे. त्यानंतर भक्तजनमंडळींनें त्याचा धांवा केला. तेव्हां विश्वेश्वर प्रसन्न होऊन त्यांनीं मुख्य पुजाऱ्याचे स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, 'मी मणिकर्णिकेंत आहें.' पुजाऱ्यानें प्रथम बुडी मारल्याबरोबर मी त्याच्या हातांत लागेन. नंतर मला वर काढून नियमित दिवशीं देवळांत सर्वत्र कापूर पसरून ठेवा, जेथील कापूर प्रथम पेटेल तेथें माझी त्याच मुहूर्तावर स्थापना करा. त्याप्रमाणें श्रीविश्वेश्वराची स्थापना त्याच्याच इच्छेनें नवीन ठिकाणीं झाली आहे, अशी आख्याइका आहे."

ही स्थापना नारायणभट नामें विद्वान तपस्वी ब्राह्मणानें केली आहे, असें म्हणतात. तसेंच बिंदुमाधवाच्या मूर्तीचा उच्छेद अवरंगजेबानें करून तेथें मोठी मशिद व सर्वांत उंच दोन मनोरे बांधले आहेत. हल्लीं बिंदुमाधवाचें देऊळ त्याच्या जवळच पुन्हां बांधिलें आहे. त्या ठिकाणीं नेहमीं मंत्र–जागरणें व वेदघोष चालूं असतो. ज्याला वेद ऐकण्याची इच्छा असेल त्यानें तेथें सकाळसंध्याकाळ बसावें. उत्तर हिंदुस्थानांत गाण्याची फार प्रसिद्धि आहे. त्यांत काशीचा ख्याल, लखनौची गज्जल, ग्वाल्हेरचा ख्याल, दिल्लीचें ध्रुपद, मथुरेची होरी, व लाहोरचा पंजाबी टप्पा हीं प्रसिद्ध आहेत. हींही ऐकावीं.

"काशीच्या सर्व पंचक्रोशी मिळून चोवीस यात्रा होतात व पंचक्रोशी करण्यास चार पांच दिवस लागतात. व त्या त्या ठिकाणीं श्राद्धें करावीं लागतात. ठिकठिकाणीं मोठमोठ्या धर्मशाळा व पाण्याच्या विहिरी आहेत. तसेंच श्राद्धास लागणाऱ्या सामानाचें दुकानही तेथेंच असतें. तरी पंचक्रोशीची यात्रा करण्यास एक गडी

व एक ब्राह्मण ध्यावा लागतो. श्राद्धें करतांना कंटाळतां कामा नये. काशीयात्रा केली असतां सर्व यात्रांचें पुण्य लागतें असें म्हणतात, तें याचकरितां. येथें मणिकर्णिका घाटाजवळ हरिश्चंद्राला ज्यानें विकत घेतलें त्या डोंबाचें घर आहे. घर म्हणजे दुमजली सुंदर हवेली आहे! जवळ हरिश्चंद्राचें स्मशान आहे. 'काश्यां तु मरणान्मुक्तिः' काशींत मरण येणें हीच मुक्ति आहे. अशी लोकांची भावना असल्यामुळें पुष्कळ लोक देह ठेवण्याकरितां येथें येतात. त्यांत हरिश्चंद्राच्या स्मशानांत जागा मिळणें, हें परमपावन समजतात. आज इतकीं युगें झालीं तरी डोंबाचा अधिकार कोणी घेतला नाहीं. व तो पूर्वीपासून पिढीजात श्रीमंत आहे तो तसाच आहे! त्याची श्रीमंती कमी होणें शक्य नाहीं. कारण प्रत्येक मरणापासून यथाशक्ति जाग्याचें भाडें त्याला मिळतेंच! जसा जसा श्रीमंत असेल तसा तसा पैसा जास्त द्यावा लागतो. म्हणजे त्याला अक्लेश पैसे मिळतात."

"काशीस रेशमी कापड, कद, पीतांबर, पैठण्या, रुद्राक्ष, स्फटिक, नाना प्रकारचीं शिवलिंगें चांगलीं मिळतात. याशिवाय भारळीचे पोहे व उंसाच्या गंड्यांचा मुरंबा हे दोन विलक्षण पदार्थ येथें मिळतात. उंसाच्या गंड्यांचा मुरंबा खाल्ला असतां तोंडांत गंड्यांचा चोथा राहात नाहीं, हें येथें विशेष आहे. येथें मोठमोठीं हलवायांचीं दुकानें असून तीं फार स्वच्छ असतात व त्यांत सर्व पदार्थ मिळतात. अगदीं एकादशीचे निरशन फराळाचे पदार्थ सर्व मिळतात आणि ते तेथील ब्राह्मणसुद्धां उपवासाला खातात. येथील भव्य मंदिरें, विशाल घाट, नाना देशांतून आलेला यात्रेचा समुदाय, मुसलमानांच्या मशिदी, मनोरे, बुद्धांचीं देवालयें, हिंदु युनिव्हर्सिटी, ॲनिबेझंटचें हायस्कूल, व अर्वाचीन चांगल्या इमारती व रेल्वेचे पूल वगैरे पाहण्यासारखे आहेत. येथील रेल्वे पुलावरून एकाच वेळीं

आगगाडी, टांगा, व माणसांची रहदारी नेहमीं चालते, एवढा तो मोठा आहे. काशीची हवा विषम आहे. म्हणजे थंडीच्या दिवसांत येथें कडक थंडी पडते व उन्हाळ्यांत फार कडक उन्हाळा होतो. यामुळें येथील लोकांत भांग-घोट्याचा प्रसार आला आहे. सारांश, काशीस इहलोकींचीं व परलोकींचीं सुखसाधनें संपूर्ण भरली आहेत. नेहमीं कोणत्याना कोणत्या देवाचे उत्सव चालूंच असतात यामुळें हें शहर नेहमीं गजबजलेलें असतें. तीर्थवास करणारास यासारखें सोयीचें दुसरें स्थळ नाहीं. ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ व संन्यास या चारी आश्रमांची येथें सोय आहे. जन्मांत कांहीं दिवस तरी काशीवास करावा असें आहे, शिवाय हें सर्व शहर पाहण्यास दोन तीन महिने तरी लागतील इतका त्याचा विस्तार आहे. यास काशीचें धुंडण म्हणतात."

जुन्या चालीच्या सनातनी हिंदूंस सर्व धर्मकृत्यांत काशीयात्रेचें महत्त्व फार वाटतें. पुराणिक हे तर कट्टे धर्माभिमानी होते. त्यांच्या पूर्वजांच्या काशीयात्रा झालेल्या होत्या. तात्यांचे आजोबा नारायणशास्त्री संवत् १९२८ सालीं पौषमासांत काशीस गेले होते. ते परत आल्यावर थोड्याच दिवसांनीं श्रीधूतपापेश्वर आर्यौषधि कारखान्याचा अल्पारंभ झाला. तात्यांचे वडील यांचाहि विचार सन १९०० सालींच काशीयात्रेला जाण्याचा ठरलेलाच होता. परंतु त्यांची प्रकृति नादुरुस्त झाली, तात्यांचें कुटुंब वारलें, अशा कांहीं कारणांस्तव त्यांचें जाणें घडलें नाहीं. कृष्णशास्त्री सन १९०५ सालीं वारले. त्यांचे वर्षश्राद्धाचे वेळीं तात्यांनीं विद्वान् ब्राह्मण मुद्दाम बोलवून प्रत्येकास वीसपंचवीस रुपयांचा ऐवज दिला. त्यानंतर तात्यांचे मनांत मातोश्रींनां घेऊन काशीयात्रेला जावें असें आलें. ही वाटाघाट पूर्वीपासूनच सुरू होती. सन १९०६ च्या अक्टोबर नव्हंबरांत ते जाणार होते. परंतु त्यावेळीं त्यांचें कुटुंब गरोदर होतें. आणि गर्भवती स्त्रीला व तिच्या पतीलाहि

सातव्या महिन्यानंतर काशीयात्रेला जातां येत नाहीं, असें धर्मशास्त्र असल्यामुळें तात्यांची सत्तंबरांत फारच उतावळी आली. श्रींकडून प्रथम परवानगी मिळेना. तूर्त बेत रहित करावा अशी त्यांची तार आली. तेव्हां तात्या फारच काकुळतीला आले. आतां हा जर योग न आला तर पुन्हां येणें कठीण. शिवाय गातोश्रींच्या वयमानानें दिनावधि करवत नाहीं वगैरे पुष्कळच गळ तात्यांनीं घातली. तेव्हां काकांकडून धोपेश्वराहून पुन्हां तार आली कीं 'काशीस सर्व मंडळीसह निघून जावें, मनोरथ पूर्ण करावे. धास्ती नाहीं. जास्त दिवस राहूं नये. दोन महिन्यांचे आंत परत यावें.'

याप्रमाणें उत्तर येतांच तात्यांना फार आनंद झाला व त्यांनीं लगेच निघण्याचा बेत कायम केला. तात्या व त्यांचे कुटुंब, रामभाऊ सहकुटुंब, तात्यांचे जामात बाबुराव डिके सहकुटुंब आणि तात्यांची आई, शिवाय चुलत बंधु पांडुरंग दादा हेहि सहकुटुंब शिवाय कारकून, नोकर, चिरनेरची कांहीं मंडळी, आश्रित मिळून पसतीस-छत्तीस मंडळी, जाण्यास निघाली. तारीख ३ आक्टोबर सन १९०६ बुधवार रोजीं घृतश्राद्ध करून पनवेलपासून एक कोसावर असलेल्या खांदेश्वर नामक महादेवाचे धर्मशाळेंत भोजन केलें. पुढें मुंब्रामार्गें शींव येथें जाऊन तेथें पहिला मुक्काम केला. तेथून दुपारचे गाडीनें निघून सकाळीं इटारसीला भोजन उरकून पुढें जबलपुरास गेले. तेथें श्री. राजा गोकुळदास ह्या बड्या श्रीमन्ताच्या बगीच्यांत चारपांच दिवस मुक्काम झाला. तेथें जास्त मुक्काम होण्याचें कारण राजा गोकुळदास यांची मुलगी क्षयानें बरीच आजारी होती. तिला औषधियोजना करावी असा राजेसाहेबांचा फार आग्रह पडला. त्याप्रमाणें औषधें देऊन तिला थोडा आरामहि पडला. त्यानंतर तारीख ९ आक्टोबरचे सुमारास अलाहाबादला जाऊन तेथें प्रयागश्राद्ध उरकलें.

हा अलाहाबादचा मुक्काम फारच आल्हादकारक झाला. त्यानंतर तारीख २१ आक्टोबर १९०६ रोजीं काशीस जाऊन ब्रह्मघाटावरील आंग्रे यांचे वाड्यांत मुक्काम केला. व तेथील वे० विनायकभटजी काळे यांचेमार्फत सर्व यात्राविधि केले. तारीख २३ रोजीं पंचक्रोशीच्या यात्रेला प्रारंभ करून तारीख २९ आक्टोबरपर्यंत पंचक्रोशीची यात्रा पुरी केली. त्यानंतर दुसरे दिवशींच महारुद्र स्वाहाकारास सुरुवात झाली. रोज तेहेतीस ब्राह्मण असत. तीळतुपाचें हवन झालें. एकशें एकवीस एकादशिन्या झाल्या. तारीख ३ नवंबर रोजीं पूर्णाहुति झाली. नंतर दुसरे दिवशीं रविवारीं पंडितांची महासभा, सोमवारीं वसंतपूजा व मंगळवारीं सर दिनकरराव राजवाडे यांच्या राममंदिरांत सांगता झाली.

तात्यांची दिवाळी काशीसच झाली. शिवाय त्यांच्या मातोश्रींच्या ऋषिपंचमी, एकादशी, वामनद्वादशी, संकट सोमवार वगैरे व्रतांचीं उद्यापनें तेथेंच व्यवस्थित झालीं. प्रयागास वेणीदानें झालीं. याप्रमाणें जेथें जें धर्मकृत व्हावयाचें तें यथास्थित झालें.

ह्या काशीयात्रेबद्दल माहिती विचारतां तेथील क्षेत्रोपाध्याय वे. शा. सं. भाऊभय्या कात्रे हे कळवितात कीं,

"श्री. तात्यासाहेबांनीं काशी येथील यात्रांगकृत्य[1] सर्व यथासांग केलें. हें कृत्य नेहमींप्रमाणें तीर्थविधि, गंगाभेट, तीर्थश्राद्ध, पंचक्रोशी[2], पंचतीर्थी[3], पिशाचमोचन या ठिकाणीं हस्तश्राद्धें व दर्शनादि

---

[1] काशींतील १६ यात्राः—(१) नित्ययात्रा, (२) अनुक्रम, (३) षडंग यात्रा, (४) त्रिकंटक यात्रा, (५) अष्टौवसू यात्रा, (६) नवगौरी यात्रा, (७) नवग्रह यात्रा, (८) एकादश रुद्र यात्रा, (९) द्वादश आदित्य यात्रा, (१०) अष्टभैरव यात्रा, (११) ज्योतिर्लिंग यात्रा, (१२) अंग यात्रा, (१३) बेचाळीस लिंग यात्रा, (१४) छप्पन्न विनायक यात्रा, (१५) अंतर्गृही यात्रा, (१३) पंचक्रोशी यात्रा.

[2] पंचक्रोशीः—कर्दमेश्वरी, भीमचंडी, रामेश्वर, कपिलधारा, भीक्षेत्र.

[3] पंचतीर्थीः—(१) आसिसंगम (२) दशाश्वमेध (३) वरुणासंगम (४) पंचगंगा (५) मणिकर्णिका.

यात्रा, तसेंच काळभैरवादि देवांनिमित्त व या यात्रेच्या सांगतेसाठीं ब्राह्मणभोजन इ० असतें."

"तात्यांनीं येथें केलेल्या ब्राह्मणभोजनास जरी येथील नेहमींच्या नियमाप्रमाणें सहस्त्रभोजन म्हणतां येत नाहीं. तरी प्रारंभापासून शेवटपावेतों त्यांजकडे हजारावर ब्राह्मणांचें भोजन झालें असा अंदाज आहे. उपर्युक्त यात्रांगकृत्याशिवाय त्यांनीं येथील उत्तमोत्तम सर्व शाखांच्या वैदिकांचें उत्कृष्ट असें मंत्रजागर करविलें. त्याप्रसंगीं शंभराच्या आंतबाहेर वैदिक मंडळी होती. त्यांस प्रत्येकीं एक रुपया दक्षिणा व मिठाई इ० देण्यांत आली. याशिवाय त्यांनीं केलेलें विशेष असें कृत्य म्हणजे महारुद्रस्वाहाकार होय. या कृत्यांत प्रत्येक एकादशनीस आठ आणे याप्रमाणें एकशें एकवीस दक्षिणा देण्यांत आल्या; शिवाय ऋत्विज इ० मंडळींची विशेष संभावना करण्यांत आली. तात्यांचें येथील संस्मरणीय काम म्हणजे त्यावेळचे काशी येथील सर्व श्रेष्ठ व जगविख्यात पंडित विद्वद्वर्य कै० महामहोपाध्याय गंगाधरशास्त्री तैलंग सी. आय. ई. यांचा त्यांनीं केलेला पूजनयुक्त सन्मान होय. अशा पंडिताग्रगण्यांचा अत्यंत समुचित असा गौरव करण्यांत श्री. तात्यासाहेबांचा मार्मिकपणा व प्राचीन विद्या व पांडित्य यांजवरील प्रेम दिसून येतें. वरील समारंभ ज्या दिवशीं सकाळीं करण्यांत आला, त्याच दिवशीं रात्रीं तात्यासाहेबांनीं येथील अजमासें पंचवीस दाक्षिणात्य शिष्टमंडळींस सन्मानपूर्वक निमंत्रण करून त्यांची संभावना केली. सदरहू शिष्टसंभावनेंत मंडळीस फराळ, नागपुरी उपरणीं व कांहीं दक्षिणा देण्यांत आली. इतर वेळीं कांहीं शिष्टमंडळीस शालीहि दिल्या. वरील धर्मकृत्यांशिवाय काशीविश्वेश्वरावर लघुरुद्र, तसेंच अलीकडे क्वचितच केल्या जाणाऱ्या येथील अंतर्गृही, दक्षिण मानस उत्तर मानस इत्यादि स्थानांच्या दर्शनयात्रांहि त्यांनीं केल्या. एकूण

कै. श्री. तात्यासाहेबांनीं केलेली काशीयात्रा त्यांच्या वैभवास व लौकिकास साजेशी अशी मोठ्या थाटाची झाली यांत संशय नाहीं."

वरील प्रमाणें यथासांग काशीयात्रा उरकून तारीख १२ नवंबर रोजीं तात्या मातोश्रींसह अयोध्येस जाऊन आले. तेथील शरयु तीर्थ-स्थान व श्री रामचंद्र जन्मभूमि दर्शन घडून त्यांना पुनीत झाल्या-सारखें वाटलें. तात्या तारीख २७ नवंबरचे पत्रांत लिहितात:—

"श्रीक्षेत्रकाशी येथें झालेल्या गोष्टी पत्रीं किती लिहाव्या ? श्रीकृपें सर्व कांहीं बहार झाली आहे व ती कशी हें येथें समाराधनेंचे दिवशीं आपणांस सहज दिसून येईल. श्रीक्षेत्र प्रयाग, काशी, गया, अयोध्या, चित्रकूट येथें सर्व ठीक आहे. वाटेंत जबलपूर येथें राव-बहादूर वल्लभदास यांना स्वतःस दमा खोकला व त्यांचे मुलीला अति-साराचा विकार फारंच आहे, त्यामुळें त्यांनीं चार दिवस राहून घेतलें इतक्या मुदतींत थोडा गुणहि वाटत आहे. असामी अति श्रीमंत नवकोट नारायण आहे; बरें वाटल्यांस फारच बहार होणार आहे !"

काशीस असतां तेथील सुप्रसिद्ध श्रीमान मुनसी माधवलाल यांच्या कुटुंबाकरितांहि तात्या औषध देत होते. पण उपयोग झाला नाहीं. दुखणीं असाध्य कोटींत गेल्यावर गुणाची आशा ती काय ! पण या व इतर, वेळीं जबलपूर, काशी, सोलापूर, इचलकरंजी, इत्यादि ठिकाणचे कोट्याधीश आणि लक्षाधीश तात्यांना मुद्दाम औषधोपचार करण्यास सांगत, त्यावरून तात्यांच्या लौकिकाची कल्पना होते. तसेंच तात्या काशीविश्वेश्वराच्या यात्रेस गेले असतांहि एकीकडे श्री धूतपापेश्वर कारखान्याची इभ्रत वाढविण्यासाठीं झटतच होते, ही गोष्टहि लक्षांत येण्यासारखी आहे. याप्रमाणें तात्यांची काशीयात्रा झाली.

**नानाशास्त्रें धुंडाळावीं । अथवा तीर्थें तरी करावीं ।**
**अथवा पुरश्चरणें बरवीं । पापक्षया कारणें ॥ दा. बो. २।४।८.**




# प्रकरण २५ वें.

## उत्सव.

**बाजहि ँ बाजन बिबिध बिधाना।**
**पुरप्रमोद नहि ँ जाइ बखाना ॥** तुलसीदास.

[अनेक प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं. शहरांत अवर्णनीय आनंद झाला !]

तात्या काशीयात्रा उरकून तारीख २५ नवंबर सन १९०६ रोजीं रविवारीं मुंबईवरून पनवेलीस आले. त्याच्या आदल्यादिवशीं त्यांचे बंधु रामभाऊ व मातोश्री वगैरे मंडळी ठाण्यावरून येऊन गांवाबाहेर श्री. आत्माराम शेट आटवणे यांच्या बागेंत उतरली होती. रविवारीं दधिश्राद्ध उरकून रात्रीं साडेसात वाजतां गृहप्रवेश झाला.

तारीख २५ नवंबर रोजींच श्री शृंगेरी शिवगंगा मठाधिपति ह्यांची स्वारी लवाजम्यासह ठाणे मार्गानें पनवेलीस येणार, असें श्रींचें आज्ञापत्र पनवेलचे प्रमुख श्री. भाऊसाहेब बापट यांस आलें होतें. श्रींचें स्वागत यथोचित कसें करावें, या विचारांतच मंडळी होती. बापट हे केवळ नामधारीच होते. त्यांची स्थिति खालावल्यामुळें त्यांचें गांवांतील वजन व कर्तृत्व दोन्हींहि सहजच कमी झालीं होती. पनवेलच्या ब्रह्मवृंदाचे सर्वांत सधन पुढारी म्हणजे तात्यासाहेबच. ते काशीयात्रेहून यावयाचे होते. त्यांच्या खालोखाल ब्रह्मवृंदांचे पुढारी

कै. कृष्णाजी काशीनाथ ऊर्फ अप्पासाहेब पटवर्धन वकील यांचें व बापट यांचें घरालगतच्या हद्दीवरील जागेवरून बरेंच वितुष्ट आलें होतें. यामुळें कधींच्या काळीं श्रींची स्वारी येणार, तर त्यांचें स्वागत सर्वांनीं एकजुटीनें व थाटानें कसें व्हावें, याच विवंचनेंत गांवांतील आस्थेवाईक मंडळी होती. पण अशा प्रसंगीं येणाऱ्या महात्म्यांचेंच भाग्य असें थोर असतें कीं, त्यांच्या आगमनप्रसंगीं ऐन वेळीं चंद्रोदयानें समुद्राला भरती यावी व सारे भेदाचे खडक तात्पुरते दिसेनासे व्हावे, त्याप्रमाणें समाजाचा उत्साह उचंबळून येतो, व त्यांतील पक्षभेद तितका वेळ तरी दबतात. या मंगल प्रसंगाचें वर्णन त्यावेळीं समक्ष हजर असलेल्या केरळ कोकिळाचे संपादकांनीं आपल्या मासिकांत केलें आहे. तेंच येथें संग्रहित करतों.

" पनवेलीस श्रींची स्वारी येऊन जर यथोचित आदरसत्कार न होईल तर पनवेलकरांस केवढें लांच्छन ! ही काळजी सर्वांच्याच मनांत उभी राहिली. तरी एक दोन मंडळींनीं पुढाकार घेऊन ती याद्री सर्व गांवांतून फिरवून एकंदर रक्कम किती जमते तें पाहून त्याप्रमाणें पुढील बेत ठरविण्याचा निश्चय केला. पण उमेद अशी कोणासच वाटेना. याचें मुख्य कारण असें जहालें होतें कीं, पनवेल गांवांत मुख्य धर्मशील सढळ हाताचे व पुढारी गृहस्थ म्हटले म्हणजे येथील आर्यौषधी कारखान्याचे प्रतिनिधी वे. रा. रा. विष्णु कृष्ण पुराणिक हे होते. ते सहकुटुंब महायात्रेस गेले असून पाठीमागें त्यांचे कनिष्ठ बंधु गदाधरशास्त्री हे चालक होते. त्यांनीं आपल्या मुखत्यारींत जेवढा आंकडा घालणें योग्य वाटला, तेवढा घालून इतर लागेल ती मदत देण्यास तयारी दर्शविली. विष्णुशास्त्री हेही ह्याच सुमारास महायात्रेहून परत येणार असेंही ठरलें होतें. परंतु जबलपुरास त्यांचा मुक्काम असतां तेथील एक

धनाढ्य गृहस्थ श्रीमंत रा. गोकुलदास यांची एकुलती एक कन्या बरीच आजारी असून शास्त्रीबुवांच्या औषधानें तीस बराच गुण आल्यामुळें त्यांनीं त्यांस अत्याग्रहानें ठेवून घेतलें. येवढ्या मोठ्या गृहस्थाची भीड त्यांस मोडवेना. यामुळें त्यांच्या तारा आणखी दोन दिवसांनीं निघतों, अशा अर्थाच्या येऊं लागल्या. आणि श्रीमत् जगद्गुरूंच्या आगमनसंधीस जर शास्त्रीबुवा नसतील तर त्या उत्सवास यावा तसा रंग येणार नाहीं, हें सर्वांसच ठाऊक होतें. परंतु स्वामींचीच कृपा सबळ, त्यामुळें सर्व योगायोग अत्युत्तम रीतीनें जुळून सर्व कांहीं उत्तम रीतीनें पार पडलें. विष्णुशास्त्री ऊर्फ तात्यासाहेब पुराणिक हेही महायात्रेहून रविवारींच येऊन पनवेलीस दाखल झाले. व श्रीमंत आत्मारामशेट ह्यांच्या बागेंतील बंगल्यांत उतरून तेथें यथाविधि श्राद्ध वगैरे करून इष्ट मित्रांसह भोजन उरकून रात्रौ सुमुहूर्तानें श्रीगंगेसह स्वगृहीं गेले, व भक्तमंडळींनीं स्वामींसही पेण मुक्कामीं अधिक दिवस ठेवून घेतल्यामुळें श्रींची स्वारी बुधवारीं सकाळीं नऊ वाजतां पनवेलीस दाखल होईल अशी दुसरी आज्ञापत्रिका प्रसिद्ध झाली. आपण महायात्रेहून येतों तोंच श्रीजगद्गुरूंच्या दर्शनाचा लाभ होऊन आपली यात्रा अधिक सुफलित होणार म्हणून पुराणिक ह्यांसही परम संतोष होऊन श्रींचें स्वागत करण्याबद्दल अधिकच हुरूप आला. स्वामींची उतरण्याची जागा येथील जुने पुराणे गृहस्थ बापट ह्यांचेच वाड्यांत निश्चित केली होती. हत्ती, उंट, बैलगाड्या वगैरे स्वामींचा सर्व लवाजमा ठाणेंमार्गानें पूर्वींच येऊन पनवेलीस दाखल झाला होता. गांवोगांवींही श्रींची स्वारी येणार म्हणून आज्ञापत्रिका रवाना करण्यांत आल्या होत्या.

अखेर बुधवार तारीख २८ नोव्हेंबर हा आनंदाचा दिवस येऊन ठेपला. सर्वांनीं स्नानें वगैरे करून छत्री व जोडा न घेतां स्वामींस

सामोरें जाण्याकरितां बापटांच्या वाड्यांत जमावें, म्हणून आमंत्रणवाला प्रत्येकाच्या घराशीं ओरडतच होता. तरी सकाळीं सात वाजेपर्यंत बापटांच्या वाड्यांत म्हणण्यासारखी मंडळी कांहीं दिसेनात ! ह्यामुळें सामोरे जाण्यास तरी भरगच्च जमाव येतो किंवा नाहीं ह्याचीच धास्ती वाटूं लागली. परंतु किती केलें तरी आचार्यांचें आदिपीठ ! त्याचा प्रभाव कोठेंही गेलें तरी सर्वांस स्फूर्ति देण्यास सदासर्वकाल समर्थ ! हीच गोष्ट पनवेलीसही दृष्टोत्पत्तीस आली. सात वाजतां जणूं काय सर्वांसच एकदम स्फुरण चढलें. कोणी आपो-आपच ध्वजा तोरणें उभारलीं, कोणी स्वयंस्फूर्तीनेंच 'स्वागतम्' वगैरे सुवर्णांकित मंगलाक्षरें लिहून कमानी सुशोभित केल्या, कोणी केळींचीं मखरें उभीं केलीं; कोणी सुंदर सुंदर आसनें वगैरे आणून तीं यथास्थानीं घातलीं; कोणीं छतें, कोणीं बैठका, कोणीं कांहीं, कोणीं कांहीं,असें करून सर्व तयारी यथासांग झाली. चौघडा, शिंगें वगैरे वाद्यें दुमदुमूं लागलीं.अशा थाटानें पालखी वगैरे घेऊन सर्व ब्रह्मवृंद व तमाम मंडळी, स्वामींचा हलकारी पुढें सूचनेस येतांच, सीमेवर जाण्यास निघाली. मार्गामध्यें गांवांतील व परगांवांतील झुंडीच्या झुंडी येऊन मिळत होत्या. अखेर सीमेच्या ठिकाणीं तर दोन हजारांवर जमाव झाला असावा. थोडा वेळ गेला नाहीं तोंच चोपदार, भालदार, छत्र-चामर-धर ह्यांसहवर्तमान मेण्यांतून संस्थान-देवतेची स्वारी येऊन दाखल-झाली. मग काय विचारावें ? 'श्रीसद्गुरु महाराजकी जय !' असा सारखा एकच जयजयकार झाला ! दर्शनासाठीं तर काय, तोब्यावर तोबा उडत होता ! अशा आनंदोत्सवांत मुख्य मुख्य मंडळींनीं स्वामींस गांवाबाहेरील मारुतीच्या देवालयांत नेऊन आसनावर बसविलें व त्यांची यथासांग पूजा, धूप, दीप वगैरे होऊन पुष्पहार गळयांत घातला, व सर्वांनीं श्रींस नगरामध्यें येऊन पूजा ग्रहण करण्याविषयीं विनंति

करण्याचा विधि वगैरे उरकला. नंतर श्रीगुरूंची स्वारी चांदीच्या पालखींत बसून मोठ्या थाटानें गांवांत येण्यास निघाली. ह्याच मारुतीच्या देवालयासमोर माणिकशहांचा मनोहर बाग असून त्यांत सुंदर बंगला आहे. त्यांतच हल्लींचे पनवेल येथील सबजज्ज खानसाहेब धनजी शहा डोसाभाई कूपर राहतात. त्यांनींही श्रीजगद्गुरूंचें दर्शन घेण्याची अपेक्षा दर्शविली. त्यांस मोठ्या आनंदानें अनुज्ञा मिळतांच तेही पालखीपुढें येऊन त्यांनींही श्रीजगद्गुरूंस अभिवंदन केलें. त्याचा श्रींनीं प्रसन्न मुद्रेनें स्वीकार करून 'आपण येथें येऊन किती दिवस झाले? प्रकृति वगैरे ठीक आहेना? हवा कशी काय मानवते?' इत्यादि कुशल प्रश्न विचारून त्यांस निरोप दिला व स्वारी पुढें निघाली."

"ह्या वेळचा स्वारीचा थाट फारच प्रेक्षणीय होता. सर्वांच्या पुढें चौघडा व वाजंत्री. त्याच्यामागून हत्ती, उंट, चांदीचा सरंजाम घातलेले कोतवाल घोडे, त्याच्यामागून भजन करीत चाललेला भजनाचा मेळा; जरीचें काम केलेलें भव्य छत्र; चांदीच्या काठीचे भालदार चोपदार; पालखीपाशीं चवऱ्या मोर्चेलें वारणारे लोक, पालखीच्या पाठीमागें गांवांतील श्रीमान् गृहस्थ; शास्त्री पुराणिक, वैदिक ब्रह्मवृंद, वकील, कामदार सुखवस्तु वगैरे गृहस्थ, शेट सावकार, मारवाडी, गुजराथी, भाट्ये वगैरे मंडळी जमून चालली होती. इतर मराठे, शूद्र गोरगरीब ह्यांची गर्दी तर कांहीं पुसूंच नये. सर्वांच्या हृदयांतून आनंद जणों काय उसळून बाहेर येत आहे, असें त्यांच्या उल्हासजनक मुद्रांवरून स्पष्ट दिसत होतें. सर्वांचीं अंतःकरणें क्षणैक संसारदुःखें विसरून जाऊन श्रीगुरुभक्तिसागरांत यथेच्छ पोहत होतीं. श्रीमज्जगद्गुरूंविषयींची पूज्य भावना प्रत्येकाच्या मुद्रेवर जणों काय मूर्तिमंत नृत्य करीत आहे असा स्पष्ट भास होत होता.

आपला धर्म म्हणजे काय ? त्याचें महत्त्व किती ? तो स्थापनकर्त्याचें माहात्म्य काय ? ह्याचा ठसा प्रत्येकाच्या हृत्पटलावर ढळढळीत उठलेला दृग्गोचर होत होता. अशा केवळ आनंदामृताच्या वृष्टींतून श्रीमज्जगद्गुरूंची स्वारी भर बाजारांत येऊन पोंचली. बाजारांतील प्रत्येक दुकानदारानें आपआपल्या शक्तीप्रमाणें व अनुकूलतेप्रमाणें आपआपल्या द्वारापुढें कांहींना कांही तरी आरास केलेलीच होती. कोणी मंगल तोरणें उभारलीं होतीं, कोणी स्वस्त्याक्षरांनीं स्वागत केलें होतें; कोणी कदलिस्तंभ उभारलेले होते, कोणी आपआपल्या द्वारापुढें सडासंमार्जन करून रांगोळ्या घातल्या होत्या, कोणी सुवासिनी ठिकठिकाणीं पंचारती घेऊन उभ्या होत्या. यःकश्चित् स्त्रियांनीं सुद्धां येवढी श्रीगुरूंची सेवा करण्याचें मनावर घेतलेलें पाहिल्यावर आमच्या म्युनिसिपालिटी अक्का का स्वस्थ बसणार ? त्यांनींही श्रींपुढें येऊन भर बाजारांत लोटांगण घातलें ! ह्या आक्कांच्या स्वागताचा लौकिक कांहीं आजकालचा नाहीं. तो सर्वांना सर्वकालीं विश्रुतच आहे. तेव्हां अशी आलेली सोन्यासारखी संधि त्या तेथेंच कशी फुकट जाऊं देतील ? त्यांनींही आपलें केरकचरारूपी धन मनोभावें एकत्र करून भर बाजारांत त्याचे ढिगले अगदीं मध्यावर घालून ठेवले होते. तेही एक दोन नव्हेत, तर दहा पांचांवर ! जणों काय, जगद्गुरूंच्या पालखीच्या भोयांची परीक्षा पहाण्याकरितां सह्याद्री–विंध्याद्रीच्या प्रतिमाच पायघड्यांना घातल्या आहेत. हा थाट पाहून ज्याच्या अंतःकरणास वाईट वाटलें नाहीं असा मनुष्य विरळाच आढळेल ! रोजची गोष्ट तर असोच, पण चारपांच दिवस श्रीमज्जगद्गुरुंची स्वारी यावयाची हें गाजत असतां, मुद्दाम हट्टानें केल्याप्रमाणें असा प्रकार व्हावा, ह्यापेक्षां आणखी शोचनीय स्थिति ती कोणती ? अस्तु.”

"अशा थाटानें श्रीमज्जगद्गुरु स्वामी महाराज की जय अशा-सारख्या जयघोषानें दशदिशा दुमदुमित श्रींची स्वारी बाजारांतून ब्राह्मणआळींतून वडाळें तलावावरील श्रीशंकराच्या व श्रीरामचंद्राच्या मंदिरावरून आर्यौषधी कारखाना उजवा घालून बापटांच्या द्वारापाशीं येऊन पोंचली. स्वामी पालखींतून उतरतांच पंचारति घेऊन सुवासिनी उभ्या होत्या. त्यांनीं आरती ओवाळली. नंतर भालदार, चोपदार ललकारत श्रीस्वामी महाराज चौकाच्या मध्यभागीं कदलीस्तंभामध्यें तयार केलेल्या उच्चासनावर विराजमान झाले, व सर्वांस बसावयास आज्ञा केली. तेव्हां ज्यास जशी जागा सांपडली तसा तो बसला. खालील चौक, माडीवरचा चौक, सोपे वगैरे सर्व जागा माणसांनीं अगदीं चिकार भरून गेली होती. शिवाय बाहेरच्या बाजूस गर्दी होती ती तर अतोनातच! नंतर बापट हे सहकुटुंब श्रींच्या पादुकांची पूजा करूं लागले. श्रींच्या समागमें आलेले वेदशास्त्रसंपन्न महादेवशास्त्री सर्वाधिकारी हे पूजा सांगत होते. यथासांग पूजा होऊन श्रींच्या गळ्यांत हार घातला व वाद्यांच्या गजरांत आरती होऊन पूजा परिपूर्ण झाली."

"नंतर स्वामीमहाराजांनीं प्रसन्न मुद्रेनें सर्वांकडे पाहून भाषणास सुरुवात केली. ते म्हणाले, 'आपला सर्वांचा भक्तिभाव व आदरातिथ्य पाहून परम संतोष झाला आहे. आज बराच वेळ होऊन गेला, ह्या-करितां उद्यां सकाळीं आठपासून दहा वाजेपर्यंत येथें व्याख्यान होईल, तें श्रवण करण्यास व आतां दुपारीं एक दोन वाजतां येथें श्रीशारदाचंद्रमौलीची पूजा, आरती, धुपारती वगैरे होईल ती पहाण्यास व तीर्थप्रसाद घेण्यास सर्वांनीं अवश्य यावें. आतां मी स्नानास जातें.' ह्याप्रमाणें सांगून स्वारी वरच्या मजल्यावर स्वस्थानीं गेली, व स्नान वगैरे आटपून पुन्हां दोन वाजण्याच्या सुमारास खालील चौकांत पूजेसाठीं येऊन पाट्यावर बसली."

"पूजा पहाण्यासाठीं व तीर्थप्रसाद घेण्यासाठींही शेंकडों लोकांचीं दाटी झाली होती. पूजेचा थाटही फारच प्रेक्षणीय होता. सोन्या रुप्याचा देव्हारा चौकोनी चार कळशी आकाराचा असून त्यावरं नकशीकाम फारच सुरेख केलेलें होतें. आंत सुमारें वीत दीडवीत उंचीची श्रीशारदांबेची सुवर्णाची मूर्ति होती, व चंद्र-मौलीचीं दोन लिंगें सुमारें चार सहा बोटें उंचीचीं असून तीं पांचेसा-रख्या रंगाचीं होतीं. ह्याशिवाय दुसऱ्याही कांहीं लहान लहान मूर्ती होत्या. तांबे, पंचपाऱ्या, पळ्या, अर्घ्यपात्रें, ताह्मनें, गंगाजळ्या वगैरे झाडून सारीं उपकरणीं चांदीचीं असून त्यांवर सुंदर नकशी होती. ब्राह्मण उच्च स्वरामध्यें रुद्रावर्तन म्हणत होते. शागीर्द कोणीं पंख्यानें वारा घालीत होते; कोणी पाण्याचे तांबे भरून देत होते; कोणीं पंचामृत पुढें करीत होते; कोणी गंध देत होते; कोणीं बिल्वपत्रें, तुलसी-पत्रें, पुष्पें वगैरे देत होते. स्वामी महाराज स्वतः पंचामृतस्नान, व अभिषेक करीत होते. नंतर गंधलेपन, सहस्रनाम वगैरे झाल्यानंतर धूप दीप, नैवेद्य होऊन गजरामध्यें आरती होऊन पूजा समाप्त झाली. नंतर महाराजांनीं स्वहस्तें तीर्थप्रसाद देण्यास सुरुवात केली. ठळक ठळक लोकांस तीर्थप्रसाद दिल्यानंतर फार उशीर झाला म्हणून इतर ब्राह्म-णांस तीर्थप्रसाद देण्यांस सांगून स्वारी भोजनास गेली. स्वामी महाराज एक वेळच भोजन करतात. आणि तेंही एकांतांत अगदीं साधें असतें. एक भात, कर्नाटकी चालीचें वरण व एखाद दुसरी चटणी असली म्हणजे झालें. कोठेंही स्वामींस भिक्षा झाली, व तेथें इतर ब्राह्मण-भोजनास पंचपक्वान्नें असलीं तरी स्वामींचा नैवेद्य हाच. आणखी भोजनास दररोज तीन किंवा चार हे निदानचे! एऱ्हवीं दूध किंवा फलाहार सुद्धां घेत नाहींत, असें म्हणतात. आणखी भोजन करणें तें सुद्धां अठरा किंवा अठ्ठावीस अशा नियमित घासांचें आहे

असें म्हणतात. शिवाय, पहांटे चार पांच वाजल्यापासून रात्रीं नऊ दहा वाजेपर्यंत नेहेमीं एका व्याघ्रांबरावर बसलेलें असावयाचें, टेकावयास तक्या-लोड नाहीं कीं क्षणभर अंग टाकीन म्हटलें तर नाहीं. मग झोंप कोठून आणावी ? पालखींत बसणें झालें तरी किती अंग तोलून बसावें लागतें हें सांगणें नकोच. असें असतांही अंगकांति आहे ती अत्यंत तेजस्वी आहे, हा मोठा चमत्कार आहे. पण हें सर्व ब्रह्मचर्याचें तेज होय. श्रीमठ संकेश्वर वगैरे मठांचे अधिपति पूर्वींचे गृहस्थाश्रमी असून नंतर संन्यास ग्रहण करतात. तशी गोष्ट श्रृंगेरी मठाची किंवा त्याच्या शाखेची नाहीं. येथील अधिपति बालसंन्यासीच असतात. त्यांस गृहस्थाश्रमाचें—अर्थात् विवाहाचें—वारेंही माहीत नसतें. प्रस्तुतचे मठाधिपति हे आपल्या वयाच्या बाराव्या वर्षींच संन्यस्त झाले आहेत. तेव्हां त्यांच्या अंगीं असें ब्रह्मतेज असावें ह्यांत काय आश्चर्य ? ”

“असो, स्वामी महाराजांचें भोजन होऊन तुलसीपत्र ग्रहण होईपर्यंत पांच साडेपांच वाजून गेले. नंतर गांवांतील कांहीं प्रमुख मंडळींचीं दर्शनें होऊन कुशल प्रश्न वगैरे झाले. वे. रा. रा. विष्णु कृष्ण पुराणिक ह्यानीं, ‘ श्रींनीं उद्ईक सर्व लव्याजम्यासह भिक्षेस येण्याची कृपा करावी,’ म्हणून श्रींची प्रार्थना केली.”

“नंतर सर्व लव्याजम्यानिशीं स्वामी महाराजांची स्वारी पुराणिक ह्यांच्या द्वाराशीं जाऊन पोंचली. पालखींतून उतरतांच यथापद्धत सुवासिनींनीं पंचारती केल्यानंतर पालखीपासून सिंहासनापर्यंत हांतरलेल्या धूत वस्त्रावरून स्वारी जाऊन उच्चासनावर स्थित झाली. ग्रामस्थ मंडळीही सर्व मंडपामध्यें बैठकीवर बसली होती. स्वामींची पूजा फार मोठ्या थाटानें झाली. पुराणिक ह्यांनीं १०८ रुपये गुरु-दक्षिणा ठेवून स्वामी महाराजांच्या अंगावर एक उत्तम छाटी घातली,

व गळ्यांत एक उत्तम आणविलेला कमालखानी हार घातला. आरती वगैरे आटोपल्यानंतर तोच हार श्रींनीं हातांत घेऊन 'आपण महात्यात्रा करून नुकतेच आलां आहांत त्याची सफलतादर्शक हा प्रसादही विश्वेश्वराचाच आहे हा ग्रहण करावा,' असें म्हणून पुराणिक ह्यांच्या गळ्यांत घातला. नंतर घरांतील बायकामुलें, आश्रित जन ह्यांच्या पूजा चालू झाल्या, व त्यांतही पन्नास पाऊणशें रुपये-पर्यंत गुरुदक्षणा जमली असावी. हा सर्व समारंभ उरकावयास दीड वाजून गेला."

"नंतर स्वामीमहाराज स्नानास उठून नित्यपूजा व तीर्थप्रसाद देण्याचा समारंभ झाला. नंतर ब्राह्मणभोजनाच्या पंक्ती बसल्या. पुराणिक ह्यांच्या नेहेमींच्याच पद्धतीप्रमाणें केशरी भात, लाडू वगैरे पंक्वान्नांचा उत्तम बेत होता. अशा रीतीनें सर्व उरकावयास पांच वाजले. हत्ती, उंट, घोडे वगैरे सर्वांस शिधा दिला. स्वारींतील विद्वान ब्राह्मणांस योग्यतेप्रमाणें दक्षणा वगैरे देऊन सत्कार केला. नंतर पुराणिक ह्यांनीं स्वामीमहाराजांस आपला सर्व आर्यौषधि कारखाना दाखविला. तेव्हां एंजिनवर चालणारे खल; त्यावर होणारें धातूचें व पत्र्याचें काम, दगडाचीं खोदलेलीं मोठमोठालीं तळघरें, औषधांचा सांठा वगैरे पाहून स्वामीमहाराज फार संतोषित झाले. व 'आपण मोठे कार्यकर्ते पुरुष आहांत; आपणांवर भगवंताची कृपा आहे,' असे मुखांतून उद्गार काढले. नंतर दुसऱ्या इमारतींत तिसऱ्या मजल्यावर श्रीसमर्थ काका पुराणिक ह्यांचा संगमरवरी स्थापन केलेला पुतळा, व त्याच्याच शेजारीं कै. कृष्णशास्त्री पुराणिक ह्यांची एक व रा. विष्णुशास्त्री ह्यांची एक अशा दोन ठेवलेल्या मोठमोठ्या ऑइल पेंटिंगच्या तसबिरीहि अवलोकन केल्या, व 'हें कोणच्या हातचें काम?' असा प्रश्न केला. तेव्हां 'पुतळा हा. मुंबईतील प्रसिद्ध चित्रकार ह्यात्रे

ह्यांच्या हातचा आहे; व ऑइल पेंटिंग ' केरळ कोकीळ ' चे संपादक ह्यांनीं काढलेलीं आहेत, असें उत्तर मिळालें. त्यावर श्रींची मर्जी प्रसन्न होऊन उभय चितान्यांची फार तारीफ करण्यांत आली. इतकें होत आहे तों रात्रीचे सात वाजण्याचा सुमार झाला. तेव्हां पुन्हा सकाळच्याच थाटानें नळे, चंद्रज्योती वगैरे दारुकाम सोडीत, रा. पुराणिक ह्यांनीं स्वामीमहाराजांची स्वारी लव्याजम्यासह स्वस्थानीं पोंचती केली. दर्शनासाठीं दाटी ही केव्हांही असेच. त्याप्रमाणें तेथेंही होतीच. त्यांचीं सर्वांचीं दर्शनें झाल्यानंतर स्वामिमहाराज सायंस्नानास उठले."

"चवथा दिवस म्हणजे शनिवार ता. १ डिसेंबर हा होय. ह्या दिवशीं सकाळीं आठपासून दहापर्यंत व्याख्यान ठरलें होतें. त्यामुळें तो उपदेशामृताचा लाभ घेण्यासाठीं समस्त ब्रह्मवृंद, शेट सावकार, आदिकरून तमाम लोक व इतर गांवचा समुदायही भरगच्च जमला होता. सरकारी कामगार व वकील मंडळी बहुतेक हजर होती. आठ वाजल्याबरोबर श्रींची स्वारी येऊन सिंहासनावर बसली व पूर्वीप्रमाणेंच कर्म ह्या विषयावर रसाळ वाणीनें मधुर भाषण केलें. हें व्याख्यानही पहिल्याप्रमाणेंच सुश्राव्य होतें. त्यांत व्याख्यानाच्या शेवटीं त्यांनीं आपण उद्यां जाणार ह्यास्तव सर्वांनीं पूर्वीप्रमाणेंच लोभ व भक्तिभाव ठेवावा म्हणून जो उपसंहार केला, तेव्हां तर सर्वांस गहिंवर येऊन नेत्रांमध्यें अश्रु भरून आले !"

## पदवीदान

"सर्व व्याख्यान संपल्यावर स्वामिमहाराज सर्वांस अनुलक्षून म्हणाले कीं ह्या गांवामध्यें वे. रा. रा. विष्णु कृष्ण पुराणिक, येथील श्रीधूतपापेश्वर आरोग्य मंदिराचे प्रतिनिधी हे फार योग्य व कर्ते पुरुष आहेत. वैद्यशास्त्रामध्यें हे मोठे पारंगत असून ह्यांची धर्माच्या ठिकाणीं

अत्यंत श्रद्धा आहे. शिवाय औदार्यामध्येंही ह्यांची मोठी कीर्ति आहे. हे सर्व गुण पाहून श्रींस परम संतोष झाला आहे व तत्स्मरणार्थ म्हणून आम्हीं त्यांस ‘ भिषग्चूडामणि ’ ही पदवी दिल्याचें प्रतिष्ठापत्र अर्पण करीत आहोंत. त्यांतील मजकूर आतां आपण श्रवण करावा. असें म्हणून महाराजांनीं तें प्रतिष्ठापत्र सर्वाधिकारी ह्यांस मोठ्यानें वाचून दाखविण्यास आज्ञा केली. त्यांतील सारांश येणेंप्रमाणें होता:—”

“रा. पुराणिक ह्यांचें प्रतिष्ठापत्र.

नं. १२२५

श्री
संस्थानचा
शिक्का

संस्थानचा मुक्काम पनवेल
जि. कुलाबा.
मि॥ मार्गशीर्ष कृष्ण १ शके
१८२८ ता. १ डिसेंबर सन
१९०६ इ०

‘ श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य इ० इ० बिरुदावली झाल्यानंतर. ’ अस्मदत्यन्त प्रियमुख्य शिष्य रा. रा. विष्णु कृष्ण पुराणिक प्रतिनिधि आर्यौषधी कारखाना पनवेल. भवदीयां विनयसंपदं दानशौंडित्त्वं वैद्यशास्त्रपारावारपारीणतामाचारतत्परतामेकभैव भवते दृष्ट्वा सत्यमेव भवान् भगवद्दयापात्रमिति मत्त्वा हर्षपारवश्येनास्माभिः भवते ‘ भिषग्-चूडामणी ’ इत्यभिख्याप्रदानं कुर्मः अभिख्यानया सत्कृस्त्वमनवरतं श्रीशारदाचंद्रमौल्यो रनुग्रहेणेतोधिकामभष्टिफलावालिमुपलभ्य परमानंद-पदं भूया इत्येवमासीः परंपरा [ श्रींचा सही शिक्का ]”

“हें सर्वाधिकाऱ्यांचें वाचून झाल्यानंतर श्रींनीं तें मंत्राक्षता श्रीफल प्रसादपूर्वक तात्यांच्या पदरांत घातलें व त्यांनींहि साष्टांग नमस्कार करून श्रींची निरंतर अशीच कृपा असावी, व वारंवार असाच दर्श-

नानुग्रह देऊन सर्वांस पावन करीत असावें, अशी सद्गदित अंतःकरणानें सविनय प्रार्थना केल्यानंतर सभा विसर्जन झाली."

"चवथा दिवस रविवार ता. २ डिसेंबर हा होय. ह्या दिवशीं सकाळीं श्रींची स्वारी जाण्याचें निश्चित झालेंच होतें. त्याप्रमाणें सर्व मंडळी स्नानें वगैरे उरकून मंडपांत आली. व स्वामीमहाराज ठरलेल्या वेळीं खालीं येऊन उच्चासनावर बसून पूजा झाल्यानंतर सर्वांस मंत्राक्षता देऊन निरोप घेऊन निघाले. त्यावेळीं ज्याच्या नेत्रांत अश्रु भरले नाहींत असा मनुष्य विरळा."

"सुयोग हा सर्वांनाच प्रिय असतो; आणि वियोग हा सर्वांनाच दुःसह असतो. सुयोग आणि वियोग ह्यांजमध्यें जमीन–अस्मानाचें अंतर आहे. ह्याचा प्रत्यय ह्या समयीं पनवेलींतील प्रत्येक मनुष्यास आला. श्रीस्वामीमहाराज आले त्या दिवसाचा उत्साह, उमेद, आनंद व तरतरी कोणीकडे, आणि श्रींची स्वारी गेल्यानंतर आलेली उदासीनता, निरुत्साह व नाउमेद कोणीकडे ? सर्वांचीं मुखें एकदम निस्तेज दिसूं लागलीं. आनंदाची मूर्तीच जणों काय नाहींशी झाली असें भासूं लागलें, सर्वांचेच कंठ जणों काय भरून आल्यासारखे दिसत होते. वियोगजन्य दुःख हाच काय तो सर्वांचा बोलावयाचा एक विषय. कोणी म्हणे झालें. अशा प्रकारची श्रीगुरुदर्शनाची संधी पुन्हां निदान आमच्या जन्मांत कांहीं येणें नाहीं! कोणी म्हणे 'पूर्वीं कधीं ४० वर्षांपूर्वीं श्रीशंकराचार्यांची स्वारी आली होती' म्हणून आमची मातुश्री म्हणत असे, कोणी म्हणे 'ब्रह्मचर्याचें तेज काय अंगावर दिसत असे!' कोणी म्हणे विद्वत्ता केवढी; शांति केवढी; व्रत किती कडकडीत; ह्याप्रमाणें अनेक प्रकारें श्रीगुरूंचे गुणानुवाद गात मंडळी घरोघर परत आली, व स्वामीमहाराजांची स्वारी आपल्या लव्याजम्यासह पळस्पें येथें श्रीमंत ओझे ह्यांच्या येथें भिक्षेस गेली."

"ह्या समारंभावरून एक गोष्ट स्पष्ट कळून येते कीं, हजारों वक्त्यांच्या, हजारों विद्वानांच्या, हजारों देशभक्तांच्या, हजारों व्याख्यानांनीं जें कार्य होत नाहीं किंवा होण्यास प्रयास पडतात तें कार्य श्रीमज्जगद्गुरूंसारख्या सत्पुरुषाच्या एका घटकेच्या व्याख्यानानें सहज होतें आणि त्याचा लोकांच्या मनावर जो ठसा उमटतो तो कायमचा असतो. फार काय सांगावें ? श्रीस्वामी महाराजांनीं जे काय दोन शब्द येथें सांगितले, ते सर्वांच्या हृत्पटलावर खोदल्याप्रमाणें राहतील आणि श्रीगुरूंचें स्मरण पिढ्यानपिढ्या चिरस्थायी होऊन राहील ह्यांत तिळमात्र शंका नाहीं. ह्या करितां प्रत्येक मठाधिपति ह्यांच्याच प्रमाणें तसदी घेऊन असेंच निदान चारपांच वर्षांनीं तरी आपल्या दर्शनानुग्रहाचा ठिकठिकाणच्या छात्रवर्गास लाभ देतील तर आपल्या वैदिक धर्मास चांगलीच जागृति येईल; आणि देशोन्नतीसाठीं स्वदेशी चळवळीसारख्या ज्या खटपटी पुढारी लोक करीत आहेत त्यांस चांगलीच मदत होऊन त्या कामीं यश येण्यास खात्रीचें साधन होईल. श्रीमज्जद्गुरूंच्या कृपेशिवाय इतर यत्नास तितका जोम येणें शक्य नाहीं. ह्यास्तव श्रीश्रृंगेरी शिवगंगामठाधिपतींनां व इतरत्र मठाधिपतींनाही अशाच प्रकारें दर्शनानुग्रहरूपी कृपा करण्याविषयीं आमची मनोभावें प्रार्थना आहे."

ह्या चरित्रांत आर्यसंस्कृतीचें किंचित दिग्दर्शन व्हावें हाच प्रधान हेतु असल्यामुळें सनातन आर्यसंस्कृतींतील एका मंगल प्रसंगाचें विस्तृत वर्णन मुद्दामच संकोच न करितां येथें संग्रहित केलें आहे. असे मंगल प्रसंग यापुढें पाहण्यास मिळतील कीं नाहीं याबद्दल शंकाच वाटते. असो.

यानंतर लवकरच सन १९०६ चे नाताळचे आरंभीं पौष शु. ६ ते ९ या सुमुहूर्तावर तात्यांनीं मावंद्याचा महोत्सव केला. पौष शु. ९ सोमवार हा महाप्रसादाचा दिवस होता. पनवेल व आजूबाजूचे

खेडेगांव, तसेंच ठाणें, मुंबई, शविं वगैरे ठिकठिकाणची ग्रामस्थ आप्त, इष्ट, मित्र, प्रमुख एजंट, अशी पुष्कळच मंडळी प्रसादाला आली होती. कारखान्याच्या इतिहासांत व तात्यांच्या चरित्रांत हा उत्सव सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखा थाटाचा झाला. याच वेळीं त्यांच्या पत्नीचे अष्ट–मास–गर्भसंस्कार शास्त्रोक्त करण्यांत आले. याप्रमाणें काशीविश्वेश्वराचा प्रसाद सर्वांनीं आनंदानें घेतला. पण विश्वेश्वराचा पुरा प्रसाद तात्यांना अद्याप मिळावयाचा होता ! तिकडेच त्यांचे डोळे लागले होते. तात्यांच्या जन्माचे वेळीं त्यांच्या मातोश्रीस थोडे दिवस जास्तच गेले होते. तसेंच यावेळींहि झालें. यामुळें उत्कंठा वाढत गेली. ज्याचे दर्शनासाठीं मन उत्कंठित असतें त्याचें आगमन होण्यास अधिकच वेळ लागतो, असा लोकांचा अनुभव किंवा निदान समज तरी असतो. अशा उत्कंठेंत तात्यांचा सन १९०७ सालचा फेब्रुवारी महिना गेला. मार्च महिन्याची पहिली तारीख फाल्गुन वद्य १ शुक्रवारचा दिवस उजाडला. त्यादिवशीं सकाळीं मुंबई टाईम १० वाजून २७ मिनिटांनीं तात्यांना पुत्रलाभ झाला. जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला ! चौघडे नौबती वाजूं लागल्या. मराठ्यांच्या बाया हेल घालूं लागल्या. अनेक दिवसांचा त्यांचा हेतु पुरा झाला. विश्वेश्वराची कृपा झाली. काशीयात्रा सफल झाली ! “ कारखान्याचा योग्य चालक पुत्र काम करीत असतां पाहाण्याइतकें पुण्य माझे पदरीं आहे काय ? ” असा तारीख २७ नवंबर १९०३ च्या पत्रांत तात्यांनीं सद्गदित अंतःकरणानें श्रीसद्गुरूंस प्रश्न विचारला होता ! त्यानंतर बरोबर चार वर्षांनीं तात्या श्रीकाशीविश्वेश्वराची गंगा घेऊन पनवेलीस आले. ती गंगा त्यांनीं आणलीं नाहीं तर ती ज्यानें आणली तो अव्यक्त गंगाधरच होता !

तात्यांचें मन अगोदरच भावनाप्रधान, त्यांत काशीयात्रा निर्विघ्न व यथास्थित पार पडून त्यांची सांगता व सफलता अशी उत्कृष्ट झालेली पाहून त्यांना अत्यानंद झाला! त्यांच्याच शब्दांत लिहावयाचें तर "अलीकडे आपणांस ज्या गोष्टीचा ध्यास लागला होता," त्या पुत्रलाभाची बातमी श्रीचरणीं व इतर आप्तेष्टांकडे कळविण्यासाठीं त्या दिवशीं त्यांनीं चोपन तारा केल्या!" पूंसवनादि सर्व विधी यथास्थित झाले. ह्या नूतन बालकाच्या पांचवी पूजनाचे दिवशीं तात्यांच्या श्रीधूतपापेश्वर पंचांगाचा जन्म झाला.

या आनंदाच्या क्षीर समुद्रावर आणखी अमृताची वृष्टि व्हावी, याप्रमाणें या भाग्यशाली नवबालकाच्या बारशाचे समारंभास श्रीसद्गुरूंची स्वारी पनवेलीस येऊन दाखल झाली! तेव्हां तात्यांच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं! बारशाचा समारंभ फारच थाटाचा झाला. सुमारें चारशें रुपयांचें सोनें व इतर वस्तु तात्यांनीं आपले नजीकचे आप्त व कारखान्यांतील प्रमुख नोकर यांस देणगीदाखल दिल्या.

काशीयात्रेचे वेळीं सर्वांत महत्त्वाचा समारंभ म्हणजे श्रीकाशी क्षेत्रांतील विद्वत्सभेचा. त्या सभेचें शिरोभूषण जणूं साक्षात् विश्वेश्वरच असे परमपूज्य महामहोपाध्याय गंगाधरशास्त्री तैलंग सी. आय. ई. यांचा आशीर्वादच फलद्रूप झाला, असा मोठेपणा त्यांस देऊन श्रीसमर्थसद्गुरूंनीं नवबालकास त्यांचेंच गंगाधर हें नांव ठेवण्यास सांगितलें. तेच श्रीमंत गंगाधर आज श्रीधूतपापेश्वर कारखान्याचे चालक आहेत. ते पाहण्यास तात्या येथें नसले, तरी ते जेथें असतील तेथून ते आपल्या भाग्यशाली चिरंजीवावर आशीर्वादाची पुष्पवृष्टिच करीत असतील यांत शंका नाहीं! कारण तात्यांना या पुत्रलाभाचें महत्त्व असेंच वाटत असे.

ह्या आनंदोत्सवाचें काव्यात्मक वर्णन तत्कालीन एका कवीनें करून तें तात्यांस अर्पण केलें. तें जसेंच्या तसेंच पुढें देत आहें.

आर्या [ आद्याक्षरी प्रबंध ]

आर्य भिषग्चूडामणि पदवी श्रीमज्जगद्गुरू देती ।
परमेश धूतपापा ! तद्वंशीं सर्वदा सुरूं दे ती ॥ १ ॥
लाभे त्वद्दिव्यौषध अबुधा विबुधा गमे सुधासम ते ॥
पुण्य किती प्रबळ अशीं पडतीं कानीं अनेक लोक मतें ॥२॥
त्रस्त गदें होउनि किति काशीरामेश्वराहुनी येतां ।
श्रीमंत गोरगरिबां चिंता वाहूनि औषधें देतां ॥ ३ ॥
धूर जसा दूर पळे घडतां गगनांत वायुचा योग ।
तद्वत तुमच्या पाहुनि पळती आरोग्यमंदिरा रोग ॥ ४ ॥
पाळितसे ईशपदा हृदयीं तुमची सदा उदार मती ।
पेरुनि त्वत्सदनीं यश भाग्यश्री म्हणुनि शारदा रमती ॥ ५ ॥
श्वसनाहि खपे न तुम्हा दुर्व्यसनीं वाहिली जणों आण ।
रत नित्य वेदकर्मीं धर्म तुम्हां वाटतो जसा प्राण ॥ ६ ॥
कृतकृत्य करुनि झाला काशीक्षेत्रामधें महत्कार्य ।
पेटी करुनि रिकामी आला भरुनि सुकीर्ति औदार्य ॥ ७ ॥
नेलें यशा दिगंतीं विद्वानांचा करूनी सत्कार ।
शतसंख्य पट्ट वाटुनी केलें मित्रांसही सुखी फार ॥ ८ ॥
ताताहि किती महात्मा कृष्णाला शोभला जसा नंद ।
युक्ताचि होइल त्याला स्वर्गींही फार फार आनंद ॥ ९ ॥
होउनि शरण गुरूंतें स्थापियली मूर्ति व्हावया स्मरण ।
वोसंडावे न कधीं कीं त्यांचे निजमनें पुन्हां चरण ॥ १० ॥

---

हरषवंत सब जहँ तहँ नगर नारि-नर-बृंद ।
[ नगरांत जिकडे तिकडे अवघा स्त्रीपुरुष समाज हर्षित झाला ! ]





सन १९०८ सालीं पनवेल येथें भरलेल्या दुसऱ्या अखिल भारतीय वैद्य महासम्मेलनाकरितां जमलेला वैद्यवर्ग व आयुर्वेद प्रेमी गृहस्थ. [पृ. ३५७




## प्रकरण २६ वें.

संतसज्जन विद्वज्जन । वेदज्ञ शास्त्रज्ञ महाजन ।
प्रबुद्ध सर्वज्ञ समाधान । विमळकर्ते ॥ १३ ॥

सभास्तवन, दासबोध.

तात्यांचें चरित्र जसें उत्सव आणि उत्साह यांनीं भूषित आहे, त्याचप्रमाणें संकटें व चिंतां यांनीं ग्रस्त आहे. कालानुक्रमानेंच सर्व गोष्टी लिहावयाच्या तर तात्यांप्रमाणें त्यांच्या चरित्राच्या वाचकांचाहि घडोघडीं रसभंग होईल, अशी भीति वाटते. यास्तव सुग्रास अन्नांत माती कालविण्याप्रमाणें काल जरी निर्घृण झाला तरी तसें मी न करितां असे अप्रिय विषय निवडून बाजूला काढून मीं तूर्त तात्यांच्या केवळ अभ्युदयाचेंच वर्णन कांहीं प्रकरणांत करण्याचें योजिलें आहे. त्यांच्या अभ्युदयाच्या कोंदणांत जे अनेक संस्मरणीय प्रसंग व प्रकार चमकत आहेत, त्यांत पनवेल येथें भरलेल्या अखिल भारतीय वैद्यक महा-संमेलनाच्या दुसऱ्या अधिवेशनाचा समारंभ ठळकपणें नजरेंत भरण्या-सारखा आहे. शिवाय भिषक्चूडामणींच्या विस्तृत चरित्रांत अशा

संमेलनाचें महत्त्व विशेषच असल्यामुळें, मी स्वतःचे माहितीनें व त्या समारंभाचे वेळीं हजर असलेल्या दोघां विद्वान् गृहस्थांच्या लेखांचे आधारें हें प्रकरण लिहीत आहें.

" पहिलें वैद्यक संमेलन श्री क्षेत्र नाशिक येथें भरलें. या संमेलनाची सर्व व्यवस्था कै. शंकर दाजी शास्त्री पदे यांनीं आपल्या अंगावर घेतली होती. कै. शंकरशास्त्री यांच्या दीर्घोद्योगानें, चिकाटीनें व अत्यंत परिश्रमानें तें यशस्वी रीतीनें पार पडलें. संमेलनास लागणारा खर्च आयुर्वेदप्रेमी श्रीमान् गृहस्थ व राजेरजवाडे यांच्या साहाय्यानें तसेंच वर्गणीरूपानें भागविण्यांत आला होता. "

" या संमेलनास कै. तात्यासाहेब पुराणिक यांनीं वैद्य दादाशास्त्री शेंडे यांस पाठवून आर्यौषधी कारखान्यातर्फे त्यांच्याबरोबर असा संदेश दिला होता कीं दुसरें संमेलन आम्ही पनवेलीस भरविणार आहोंत, तेव्हां जमलेल्या सर्व वैद्यांनीं व सद्गृहस्थांनीं पनवेलीस येण्याची कृपा करावी. कधीं भरविणार यासंबंधानें वर्तमानपत्रद्वारा व व्यक्तिशः निमंत्रणपत्रिका जातील त्यावरून कळून येईल."

" कै. तात्यासाहेब पुराणिक यांनीं दुसरें संमेलन १९०८ सालीं पनवेलीस भरविलें; व संमेलनाची सर्व व्यवस्था कै. शंकर दाजी शास्त्री पदे यांजकडे सोंप्रविली होती. याचें कारण पहिलें संमेलन त्यांच्याच कर्तबगारीनें व माहितीनें उत्तम प्रकारें पार पडलें हें होय."

"काशी, मथुरा, जयपूर, मारवाड, गुजराथ, नाशिक, धुळें, मुबई वगैरे प्रांतांतून सुमारें ७५ उत्तमोत्तम वैद्य, आणि इतर श्रीमान व सभ्य गृहस्थ अदमासें २००–३००, इतकी मंडळी ह्या संमेलनास जमली होती. हेतु हा कीं साऱ्या महाराष्ट्रांत गाजत असलेला पनवेलचा यांत्रिक शक्तीवर चालणारा आर्यौषधि कारखाना आहे तरी कसा हें आपल्या स्वतां डोळ्यांनीं पाहून यावें. कल्याणवरून

येणाऱ्या सद्गृहस्थांचा आदरसत्कार विष्णुलोकवासी गंगाविष्णु ह्यांच्या श्रीलक्ष्मीव्यंकटेश्वर छापखान्यांतून करण्यांत आला. आयुर्वेद महामहोपाध्याय, शंकर दाजीशास्त्री पदे, वैद्य वगैरे कार्यकारी मंडळी चैत्र शुद्ध पौर्णिमेलाच जमा झाली होती. पनवेल येथील श्रीमान् नगरशेट आत्मारामशेट आटवणे, ह्यांच्या रमणीय बागेंत सभामंडप उभारला होता. आणि तेथील सुंदर हवाशीर बंगल्यामध्यें व इतर बांधलेल्या मांडवांतून सर्व पाहुण्यांची रहाण्याची व भोजनाची वगैरे सोय केली होती. बागेंतील दरवाजा ध्वजा उभारून 'स्वागतमस्तु' वंदेमातरम् 'दशकं धर्मलक्षणम्' इत्यादि सुवर्णांकित मंगलाक्षरें व सुवर्णांकित श्लोक लिहिलेले झळकत होते. पनवेल येथील श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिराचे प्रतिनिधि, तात्यासाहेब पुराणिक, ह्यांनीं पाहुण्यांसाठीं वाहनें व भोजनाची तजवीज उत्तम ठेवून फार उत्तम सत्कार केला."

"मुख्य दिवस म्हणजे चैत्र वद्य प्रतिपदा, शुक्रवार, हा होता. ते दिवशीं मुंबईहून स्पेशल स्टीम लाँच काढून श्रीव्यंकटेश्वर छापखान्याचे मालक धर्मात्मे श्रेष्ठी खेमराज श्रीकृष्णदास, त्रिभुवनदास मंगळदास, जयपूरचे पाठशाळाध्यापक आयुर्वेद विद्यानिधि पंडित गंगाधर शास्त्री, मथुरेचे जहागिरदार वैद्यवर्य बाळशास्त्री लागवणकर वगैरे मंडळी साडेदहा वाजतां येऊन दाखल झाली. चार वाजतां संमेलन सभेच्या कामास सुरवात झाली. प्रथम श्रेष्ठी खेमराज श्रीकृष्णदास ह्यांचें भाषण झालें. त्यांत त्यांनीं आपल्या सनातन भारतधर्माचा जीर्णोद्धार करणें अत्यंत अवश्य असून त्याबरोबरच आर्यवैद्यकाचाही जीर्णोद्धार करणें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे, इ० सारांश हिंदुस्थानी भाषेंत सांगितला. नंतर आर्यौषधि–कारखान्याचे प्रतिनिधि भिषक्चूडामणी, विष्णु कृष्ण पुराणिक, ह्यांचें

स्वागतपर सुंदर भाषण, त्यांचे धाकटे बंधु गदाधर कृष्ण पुराणिक, कारखान्याचे चालक, ह्यांनीं वाचून दाखविलें."

## भि. चि. विष्णुशास्त्री पुराणिक यांचें स्वागतपर भाषण.



मार्कण्डेय दयापरो यमहितान्दूतान्परावर्तयन् ।
संयम्यापि यमं स्वभक्तकृपया यातं रुषा यातने ॥
यो मृत्युंजयतां निजां प्रकटयन् मूर्त्या विरूपाक्षया ।
सो व्याच्छंतमया स्वया स्वहितया वो धूतपापेश्वरः ॥ १ ॥

हें भाषण अनेक दृष्टीनीं बरेंच महत्त्वाचें असल्यामुळें यापुढें समग्रच देत आहें.

"सद्गृहस्थहो, आज बरोबर एक वर्ष झालें. गेले सालीं श्रीहनुमानजयंतीच्याच समयास याच स्थलीं ह्या जिल्ह्यांतील व बाहेरील कांहीं विद्वान् राष्ट्रभक्तांचें आगमन झालें होतें. त्यास पुरें वर्ष झालें नाहीं तोंच आपलेसारखे विद्वद्वर्य संतसज्जनांचा सन्मान करण्याची संधी पनवेलीस आज दुसऱ्यानें प्राप्त झाली आहे हें पाहून फार आनंद वाटतो. आपल्यासारख्या विद्याविशारद पंडितांचें स्वागत कसें करावें हें माझेसारखे खेडवळ व अनभ्यस्त मनुष्यास कोठून समजणार ! परंतु त्या भक्तवत्सल श्रीरामानें ज्याप्रमाणें गरीब बिचाऱ्या शबरीचीं बोरें प्रिय मानून घेतलीं त्याचप्रमाणें आपण आमचेकडून होणारें अल्प स्वल्प आदरातिथ्य गोड मानून घ्याल अशी आशा आहे. येथें आमचे कर्तबगारीपेक्षां आपले मनाचे उदारपणावरच आमची जास्त भिस्त आहे. व त्याच उमेदीवर आम्हीं ही जबाबदारी पत्करली आहे. आपण थोर आहांत, तेव्हां न्यूनाधिकाकडे विशेष लक्ष आपण देऊं नये व आपले कृपामृताचे वृष्टीनें सर्व कांहीं गोड करून घ्यावें, अशी आपणा सर्वांस माझी सविनय प्रार्थना आहे."

"सभाजनहो, आपण दूरदूरचे प्रांतांतून येथें येण्यानें फार श्रमलां असाल. प्रवासामुळें आपले नित्यकर्मास थोडा खंड पडून क्वचित् आपद्धर्माचाही आपणांस अवलंब करावा लागला असेल! आपणांपैकीं कित्येकांची शिष्यशाखा आपले गुरुजी परत केव्हां येतील ह्याची वाट पहात असेल! व कित्येक रोग्यांचे डोळे वैद्यराजांचे वाटेकडे लागले असतील! परंतु त्या सर्वांस नाराज करून आपण आमचे विनंतीस मान देऊन येथें आलांत त्याबद्दल आम्ही आपले अत्यंत ऋणी आहोंत."

"सनातन-भारतधर्म-महापरिषद्, ब्राह्मण महासभा, वैद्यकसंमेलन व वैद्यकप्रदर्शन असा चतुर्विध योग आज आला आहे. आपले सर्वांचे दर्शनानें आम्ही कृतार्थ झालों आहोंत! व आपले पायधुळीनें ही भूमि पावन झाली आहे. वास्तव आपलें सर्वांचें मी मनःपूर्वक स्वागत करतों. आजच्या प्रसंगीं आपलें ज्या तऱ्हेचें स्वागत करण्याचा माझा विचार होता, तसें करण्यास उदासीनतेनें बरीच न्यूनता झाली आहे. कारण, आमचे एक कनिष्ठ बंधु बापुराव ह्यांचा नुकताच पटकीचे आजारानें एकाएकीं अंत झाला! बापुराव हे मुंबईस वैद्यकीचा धंदा करीत असंत. कारखान्याची पुढील भिस्त त्यांचेवर विशेष होती व यामुळें ते गेल्यानें कारखान्याची फारच मोठी हानि झाली आहे.! तथापि कार्याचें महत्त्व ध्यानीं आणून मजकडून होईल तितकें कार्य मीं केलें आहे."

"आतां श्रोतृजनहो, प्रस्तुत प्रसंगाचें महत्त्व व कार्यकारणभाव आपले नीट लक्षांत येण्याकरितां चार प्रास्ताविक शब्द सांगणें जरूर आहे. आज सनातन भारतधर्म महापरिषद्, वैद्यकसंमेलन, व ब्राह्मण महासभा अशा तीन संस्था एकत्र झाल्या आहेत. ह्या आजच एकत्र झाल्या आहेत असें नाहीं, तर आरंभींही त्या एकवटच होत्या. ह्या आर्यावर्तांत

अत्यंत प्राचीनकाळीं ब्रह्मवृंदांकडून धर्मपरिषदा तर होत असतच, परंतु वैद्यकीय संमेलनेंही तेच करीत असत. उदाहरणार्थ चरकासारखे ग्रंथ आत्रेयादि ऋषींचे अध्यक्षतेखालीं भरलेल्या काश्यप, मारिच, धन्वंतरि, निमी, इ. वैद्यांचे संमेलनाचा एक रिपोर्टच आहे असें म्हटलें असतां चालेल. इतर देशांतही प्राचीनकाळीं सर्व ज्ञानभांडाराची गुरुकिल्ली धर्मगुरूंजवळच असे. ज्यानें खरें धर्मरहस्य जाणलें,व ज्यांस तत्त्वज्ञान झालें त्यांस इतर शास्त्रांतील गूढ सिद्धांत तेव्हांच समजतात असें म्हणण्यास हरकत नाहीं."

"सर्व शास्त्रांत धर्मशास्त्र व वैद्यशास्त्र हींच अत्यंत प्राचीन शास्त्रें आहेत. एकादा बायसिकल्स तयार करणारा कारखानदार ज्याप्रमाणें सायकल्स नीट दुरुस्त ठेवण्यासाठीं यंत्रसामुग्रीही अगोदरच तयार करून ठेवतो, त्याप्रमाणें परमेश्वरानें तनु आणि मन यानें युक्त अशी मानव जात ज्यावेळीं निर्माण केली, त्यावेळीं तनुदुरुस्तीकरितां वैद्यक व मनदुरुस्तीकरितां धर्म ह्या दोन शास्त्रांचीही स्फूर्ति मनुष्य-मात्राचे ठिकाणीं उत्पन्न केली असली पाहिजे हें उघड आहे. एक लेखक म्हणतो "स्त्री गर्भिणी असतांनाच प्रसूतिकालानंतर अवश्य लागणाऱ्या जिनसा व सूतशेखरादि औषधें जर सामान्य लोकही घरांत बाळगीत असतात तर सृष्टि उत्पन्न करण्यापूर्वी रोगनिरसनोपाय लक्षांत आणण्याइतकाही दूरदर्शी ब्रह्मदेव नव्हता अशी कल्पना करणें नीट नव्हे." हा केवळ कोटिक्रम नसून ह्यांत पुष्कळ तथ्य आहे. सुमारें पांचहजार वर्षांचे पूर्वी इजिप्त देश पुष्कळ भरभराटींत असतां उसरकाफ नांवाचे राजाचे दरबारीं पेहेनुका नामक अत्यंत प्रख्यात धर्मशास्त्र व वैद्यशास्त्रसंपन्न पुरुष होता. व त्याची बायको ज़ेफासेन हीही तितकीच व्युत्पन्न होती, असें ग्रंथांतरीं आढळतें. अर्थात् आपलेकडचीं शास्त्रें त्यापूर्वींच निर्माण झालीं असलीं पाहिजेत हें

उघड आहे. किंबहुना वेद जर अनादिकालचे आहेत तर वैद्यकहा अनादिकालचेंच आहे असें म्हटल्यास हरकत नाहीं. कारण आयुर्वेद हा अथर्ववेदाचा एक उपवेद आहे, असें शास्त्रज्ञ लोक मानतात. निदान अश्विनीकुमार कांहीं आजकालचे नव्हत ! चंद्राइतका जुनाट क्षयरोगी दुसरा क्वचितच असेल ! तात्पर्य आमचे मनास सुसंस्कृत ठेवणारा आमचा सनातन भारतधर्म व आमचे शरिराची जोपासना करणारा हा आयुर्वेद ह्या दोन प्राचीन शास्त्रांकडे नजर फेंकली म्हणजे त्याबद्दल आपले ठिकाणीं अत्यंत आदर उत्पन्न होतो. व ह्यांचे समृद्धीनें जो देश पुनीत झाला आहे त्या भारतवर्षांत देवानें आपणांस जन्मास घातलें याबद्दल कृतज्ञता, अभिमान, आनंद इत्यादि मनोवृत्तींनीं हृदय भरून येतें !"

" आपलीं धर्मशास्त्रें व वैद्यशास्त्रें हीं जितकीं जुनीं आहेत तितकीं त्यांस संभाळण्याची जबाबदारीहि आपलेवर अधिक आहे. आपलें केवळ जीवन त्यांजवर अवलंबून आहे. जोंपर्यंत तनु व मन हीं दुरुस्त आहेत तोंपर्यंतच सर्व गोष्टी आहेत. ज्याप्रमाणें मनावांचून तनु नाहीं, व तनुवांचून मन नाहीं, त्याप्रमाणेंच तनु व मन हीं नीट असल्यावांचून कोणतीहि प्रगति होणें शक्य नाहीं. ह्याप्रमाणें ह्या दोन्ही शास्त्रांचा संबंध अत्यंत सन्निकट आहे. व जगाचे सुधारणेचे अगदीं मुळाशीं तीं बीजरूपानें आहेत. त्यांकडे दुर्लक्ष केलें असतां कोणतीच सुधारणा शक्य नाहीं हें उघड आहे. असें असतांही त्यांजकडे तादृश लक्ष न देतांही आज आपण राष्ट्र म्हणून अर्धवट तरी जिवंत आहों, ही केवळ त्या कारुणिक परमेश्वराची आपणांवर दया आहे असें समजलें पाहिजे."

"द्रोणागिरी पर्वत खांद्यावर मारून उड्डाण करणारे बजरंग, एका लाथेसरसे मोठाले वृक्ष उन्मळून टाकणारे भीमदादा, सहजलीलेनें

मोठ्या इमारतीचा एक खांब उचलून त्या खालीं पाटीलबुवांचा आंगरखा अडकवून देणारे पेशवाईतील भट्ट, यांची ताकद पाहिली, व वसिष्ठ, व्यासादि महामुनि, श्रीशंकराचार्य, विद्यारण्य इ. विद्वद्रत्नें, समर्थ-ज्ञानदेव-तुकारामादि संत यांची धर्मासंबंधीं कळकळ व तेजस्विता पाहिली म्हणजे अलीकडील राममूर्ति व वेदमूर्तिही अगदीं निस्तेजसे भासूं लागतात! गेले पंचवीस वर्षांतील आमचेकडील हजारों रोगी लोकांचा पत्रव्यवहार वाचला तर उत्तरोत्तर प्रजा निःशक्त, निस्तेज, व निरुत्साही बनत चालली आहे, असें दिसून येईल. अगदीं निरोगी व निकोप अशा माणसांचें प्रमाण शेंकडा दहा तरी पडेल कीं नाहीं याची शंकाच आहे! भयंकर जीवनकलहामुळें लोक जेरीस आले आहेत. लोकांचीं धर्मबंधनें सुटलीं आहेत, सुधारलेल्या म्हणून नांवाजलेल्या कुटुंबांत लग्नापूर्वींच मुलीस रजोदर्शन व मुलांचा वीर्यनाश असले विपरीत प्रकार दिसून येत आहेत! त्यांत अशिक्षित व सुशिक्षितांतही परदारागमन, वीर्यपात, मद्यपान, धूम्रपान, चहापान इत्यादि लहानमोठ्या व्यसनावरील आसक्तीनें अलीकडील जवानमर्दांची तनु म्हणजे रोगांचें माहेरघर व मन म्हणजे सैतानाचें क्रीडास्थान झालें आहे! ज्ञानेंद्रियांनीं अज्ञान वरलें आहे! कर्मेंद्रियांनीं सत्कर्म सोडलें आहे! मनानें आपलें नपुंसकत्व सिद्ध केलें आहे! उदरंभरणाचे उपाधीनें चित्त चिंताक्रांत झालें आहे! नानाप्रकारचे कुतर्कानें बुद्धि भ्रष्ट झाली आहे. आपलेपणास मुळींच ठाव ठिकाणा नाहीं; व म्हणून जीवात्मे असली ही भूभारवत् तनु सोडून पटापट चालते होत आहेत! अकालिक मृत्यु ही रामराज्यांतील एक अत्यंत आश्चर्यकारक गोष्ट होती. परंतु हल्लींचे काळीं जिवंत राहणें हेंच एक महदाश्चर्य होऊन राहिलें आहे. हा प्रभाव कालगतीचा आहे. परमेश्वरानें मनांत आणल्यास ही कालगति फिरण्यास कांहीं विलंब

लागणार नाहीं. परंतु त्यासाठीं आपण अहर्निशीं झटलें पाहिजे. मन्वादिकांपासून तों अलीकडील विष्णुबोवा ब्रह्मचारी, विवेकानंद यांजपर्यंत धर्मवेत्त्यांनीं, व सुश्रुत-चरकादिकांपासून तों अलीकडील बापूसाहेब मेहेंदळ्यांपर्यंतच्या भिषक्चूडामणींनीं ज्या शास्त्रांतील अपूर्व तेजानें सर्वांस थक्क करून सोडलें, त्या वेदोक्त शास्त्रांचा खरा खरा अभिमान आपण बाळगला पाहिजे. खेदाची गोष्ट आहे कीं, अलीकडे वेदोक्त हा एक उपहासाचा शब्द होऊन बसला आहे! धर्मशास्त्रांतील गुणत्रिपुटी, व वैद्यशास्त्रांतील दोषत्रिपुटी ही कल्पना सृष्टींतील कांहीं तरी असंबद्ध प्रमेयें आहेत असें लोकांस वाटूं लागलें आहे. पूर्वज व त्यांच्या कृती यांजबद्दल आदरभाव नष्टप्राय होऊन पाखंडवाद ऊर्फ मतस्वातंत्र्य फारच माजलें आहे. त्यांत नाना पंथ, नाना मतें झाल्यामुळें खऱ्याखोट्यांचा निवाडा करणें हें काम मोठ्या मुष्किलीचें झालें आहे. धर्मसंबंधीं पाहूं गेलें असतां कोणी निरीश्वरवादी आहेत तर कोणी एकेश्वरी पंथाचे आहेत. कोणी द्वैतवादी आहेत, तर कोणी द्वैताद्वैत प्रतिपादित आहेत, कोणी सर्व धर्मांचें रहस्य काढून, एक वेगळाच पंथ काढीत आहेत. कोणास नुसतेंच तत्त्वज्ञान पाहिजे आहे तर कोणी कोरड्या कर्मकांडांतच गुंतून राहिले आहेत. कोणी चंद्रभागेचे कांठीं डाव मांडण्यांत दंग झाले आहेत, तर कोणी किरिस्तावांचे सारखे देवळांत जमून डोळे मिटून परमेश्वराचें स्तोत्र गात आहेत. असे किती प्रकार म्हणून सांगावे! वैद्यकाबद्दलही आजकाल हीच स्थिति आहे. कोणी रोगोत्पत्तीची उभारणी रस-गुण-व्यवस्था व त्रिदोषव्यवस्था यांजवर करितो, तर कोणी सर्व रोग जंतुरूप आहेत असें प्रतिपादन करितो. कोणी कोणी उष्णतेनें उष्णता शमविण्याचें शास्त्र काढतो, तर कोणी थंड-पाण्यांत बसवून उष्णता नियमित करण्याची युक्ति लढवितो, रोग्यांस

औषधपाणी न देतां कोणी शस्त्रक्रियेनें, तर कोणी दंभप्रयोगानें, कोणी रोग्याच्या भावनेवर सत्ता चालवून, तर कोणी मंत्रतंत्राचे उपायानें, रोगांचें निरसन करूं पाहतात. अशा प्रकारें नानापंथ, नानामतें झाल्यामुळें बुद्धिमान् पुरुषांचे प्रयत्न विभागले जातात व शास्त्रांचे प्रगतीचे दृष्टीनें नुकसान होतें. तथापि असें हें मतवैचित्र्य असावयाचेंच, त्यास कारण केवळ इंग्रजी विद्या आहे असें म्हणतां येणार नाहीं. इंग्रजी विद्या अस्तित्वांतहि नव्हती त्यावेळींही चार्वाक, क्षपणकादि नास्तिक व गौतमबुद्धादि आस्तिक वेदोक्ताचे द्वेष्टेच होते. तोच प्रकार आज आहे. तफावत इतकीच कीं, सर्व सामान्य लोकांत एतद्विषयीं अज्ञान व औदासीन्य जास्त वाढलें आहे. प्रतिस्पर्ध्यांचे मतांचें खंडण करून लोकांत जोम व जागृति उत्पन्न करणारे सामर्थ्यवान् पुरुष कोणीच राहिले नाहींत काय ? असा लोकांस प्रश्न उत्पन्न झाला होता. परंतु अलीकडे सनातन भारतधर्म महापरिषद् स्थापिन झाल्यापासून व गुदस्तसालीं वैद्यांचें सम्मेलन झाल्यापासून लोकांस आशा करण्यास जागा झाली आहे. ह्या दोन संस्थांचें वास्तविक महत्त्व अद्यापही सुशिक्षितांचेही नीटसें लक्षांत आलेलें दिसत नाहीं. तथापि यासाठीं निराश न होतां असा सतत प्रयत्न सुरू ठेवला असतां लोकांस त्यांचें महत्त्व कळूं लागेल. ”

“हा चार दिवसांचा उत्सव म्हणजे वर्षभर केलेल्या कामाचें नुसतें दिग्दर्शन आहे. एवढ्या मोठ्या वादग्रस्त व महत्त्वाच्या विषयाची चर्चा चार दोन दिवस व्याख्यानें देऊन होणें शक्य नाहीं हें उघडच आहे. त्यास आस्थेवाईक विद्वान् मंडळींनीं एकेक महिना एके ठिकाणीं बैठक करून एकेक मुद्याचा शांतपणानें विचार करून तो तडीस लावीत गेलें पाहिजे. धर्मसंबंधीं समाजसुधारकांनीं नानाप्रकारचे प्रश्न उत्पन्न केले आहेत. त्याचप्रमाणें वैद्यकासंबंधीं नानाप्रकारचे प्रश्न

विचार करण्यासारखे आहेत. आतां ब्राह्मण महासभाही येथें जमणार आहे. पूर्वपरंपरेकडे लक्ष दिलें असतां ( अध्ययन व अध्यापन ) ह्या कामीं ब्राह्मणांनींच पुढाकार घ्यावयास पाहिजे. तेव्हां ब्राह्मण महासभाहि याकामीं शक्य ती मदत करील अशी पूर्ण उमेद आहे. आतां हे उद्दिष्ट हेतु कसे तडीस न्यावेत. हे जे महत्त्वाचे प्रश्न त्यासंबंधीं यापुढें येथें विद्वान लोकांकडून ऊहापोह व्हावयाचा आहे. तथापि त्यासंबंधीं ओघासच आलें म्हणून कांहीं दिग्दर्शन करितों."

"कोणतेंही शास्त्र केव्हांही पूर्णदशेस गेलें आहे असें ह्मणतां येणार नाहीं. आपण जों जों पुढें जावें तों तों पर्वतांचे रांगेप्रमाणें त्यापुढेंही अज्ञात असें पुष्कळच राहिलें आहे असें वाटूं लागतें. सारांश, कोणत्याही शास्त्रांत देशस्थितिकालमानावरून व अनुभवावरून सुधारणा होण्याचा नेहमीं संभव असतो. परंतु सुधारणा करण्यापूर्वी मूळचें काय आहे, त्याचें संपूर्ण ज्ञान व्हावयास पाहिजे. पहिलें कर्तव्य तेंच आहे व तेवढेंच कर्तव्य जरी आपण आज बजाविलें तरी तूर्त पुष्कळ होणार आहे. ह्या दृष्टीनें आपण विचार केला असतां आपणांस असें दिसून येईल कीं, आज जो आर्यवैद्यकाचा ऱ्हास झालेला आपणास दिसत आहे, त्याचें कारण आर्यवैद्यकाविषयीं सांप्रत असलेलें अज्ञान हें होय व त्यांतही कित्येक अनधिकारी व स्वार्थसाधु लोकांनीं "कांहींच होईना तर कर वैद्यकी" असा जो उपक्रम मांडला आहे, त्यामुळें आमचे वैद्यकावर लोकांची श्रद्धा मुळींच राहिली नाहीं. आपण आजकालच्या वर्तमानपत्रांत अनेक रामबाण औषधांच्या जाहिराती वाचतों. त्या देणाऱ्या इसमांपैकीं शेंकडा कितीसे लोक आर्य वैद्यकांतील दोन चार ग्रंथ तरी पढलेले आढळतील बरें ? तात्पर्य, वैद्यकीचा धंदा करणारे व वैद्यकीय औषधींवर व्यापार करणारे गृहस्थ ह्या शास्त्रांत जितके

निपुण असावयास पाहिजेत तितके नाहींत; यामुळें निदान आणी-बाणीच्या वेळीं तरी डॉक्टरास बोलावून आणणें भाग पडतें. ह्याप्रमाणें चांगल्या माहितगार व अनुभवशीर वैद्यांची ही उणीव भरून काढण्याकरितां या संमेलनाचे देखरेखीखालीं ठिकठिकाणीं आयुर्वेद-शाला निघाल्या पाहिजेत. रोगचिकित्सेवर देशी भाषेंत स्वतंत्र मोठमोठाले ग्रंथ निघाले पाहिजेत. शारीर, इंद्रियविज्ञान व शस्त्रक्रिया या विषयांसंबंधीं आपल्या शास्त्रावरून नीट बोध होत नाहीं असें म्हणतात. आपले शास्त्रवेत्त्यांस ह्या गोष्टी अवगत नव्हत्या असें नाहीं, ज्या कालीं धन्वंतरी, सुश्रुत यांसारखे नामांकित शस्त्रवैद्य होऊन गेले, त्या कालीं या सर्व गोष्टी माहित असल्याच पाहिजेत. परंतु परकीय अमलाखालीं आमचें अमूल्य ग्रंथभांडार नाश पावलें, त्यामुळें किती प्राचीन शास्त्रें लुप्तप्राय झालीं असतील तें सांगतां येणार नाहीं. जोंपर्यंत तीं उपलब्ध नाहींत तोंपर्यंत आपणांस तितक्यापुरतें आंग्ल विद्येचें साह्य घेणें जरूर आहे."

"अलीकडे रोगसंकर होत चालला आहे, अशा रोगांच्या संबंधीं औषधयोजना करणें, म्हणजे गुंतलेला दोरा सोडविण्यासारखें मोठ्या युक्तिचें व त्रासाचें काम आहे. दोऱ्याची गुंतागुंत एका आंगून सोडवावी, तर दुसऱ्या आंगास अधिकच पीळ बसतात, अशी त्यांत बरीच भानगड उत्पन्न होते. त्याचप्रमाणें प्लेगसारख्या तीव्र विकारांवर औषधयोजना करणें म्हणजे उडत्या पांखराची शिकार करण्याप्रमाणें फार धोरणाचें, कसबाचें व जलदीचें काम आहे. तसेंच कांहीं कांहीं रोग मोठे खितपणीचे असतात, त्यांवर बरोबर मर्मींच योजना झाली तर उपयोग! नाहीं तर गांठळ लांकूड फोडतांना लांकूडफोड्याचे जसे हाल होतात, त्याचप्रमाणें वैद्याची अवस्था होते. ह्यासाठीं रोगोत्पत्तीस अत्यंत सन्निकट कारणें काय होतात

किंवा रोग उत्पन्न होते वेळीं त्या त्या ठिकाणीं अंतर्गत रचनेंत काय बिघाड होत असतो, हें वैद्यास समजणें अत्यंत जरूरीचें आहे. तसेंच अमुक एक औषध दिलें असतां, त्या त्या औषधाचा त्या त्या ठिकाणीं कसा कसा परिणाम घडेल याचेंही ज्ञान वैद्यास असावयास पाहिजे."

"त्रिदोष वाढले असतां देहांतर्गत स्थिति प्रत्यक्ष काय होत असते हें समजलें पाहिजे. याप्रमाणें योजक जर कुशाग्रबुद्धीचा असेल, तर स्वल्प उपायानेंही रोग्यास गुण आणील, व औषध जर बहुगुणी व निरुपद्रवी असेल, तर अडाणी ठाकराचे हातूनही दुःसाध्य रोग बरे होतील. तथापि चांगले योजकाचे हातीं उत्कृष्ट औषध असणें हेंच सर्वांत अधिक इष्ट आहे, हें उघड आहे. यासाठीं चांगले वैद्यांची व चांगले गुणकारी औषधांची निवड या वैद्यकीय संमेलनांत होणाऱ्या परीक्षा व प्रदर्शनें यांचे द्वारें होईल, तर त्यापासून लोकांचा पुष्कळ फायदा होईल."

"आपले देशांत धर्मशास्त्र, वैद्यशास्त्राला जितकें धरून आहे, तितकें इतरत्र क्वचितच आढळेल. तसेंच आमचेकडील वैद्यही धर्मशास्त्राला जितके धरून चालत आले, तितके इतर देशांत सांपडणें कठीण. यामुळें रोग्याचा रोग निरसन करण्यास औषधींशिवाय आपलेकडील पूर्वकालीन वैद्यांजवळ आणखी एक बलवत्तर साधन असे. त्यांची सदाचारसंपन्नता व धर्मतेजस्विता यांचे योगानें त्यांचे हातांत एक प्रकारची सिद्धशक्ति उत्पन्न झालेली असे, व असे ते वैद्यराज रोग्याजवळ येऊन बसले म्हणजे, रोग्यास धीर येऊन त्यांचे गंभीर व प्रीतियुक्त वाणींतून एकदां रोग्यास अभय मिळालें असतां त्याची " आपण नक्की बरे होणार " अशी दृढ भावना होऊन त्यास आराम पडे. ह्या गोष्टींकडे अलीकडील वैद्य व डॉक्टर लोक जितकें जास्त